

# दैवमंडन.

किंमत ६ आणे.

हें पुस्तक लक्ष्मीव्यंकटेश्वर छापखाना येथें मिळेल.

॥ श्रीः ॥

# दैवमंडन.

## नशीब आणि उद्योग

या विषयाचा विचार.




---

हें पुस्तक

वे० शा० बापु विष्णु शास्त्री केळकर

वास्तव्य कल्याण यांनीं लिहिलें,

तें

दिनानाथ मोरेश्वर तळेकर, राहणार कल्याण

यांनीं

कल्याण येथें;

"लक्ष्मीवेङ्कटेश्वर" छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

सन १८९५.

किंमत ६ आणे.

हें लहानसें पुस्तक

रा॰ रा॰ शंकर गंगाधर नाईक

यांस,

त्यांची महाराष्ट्रभाषारसिकता पाहून

प्रसिद्धकर्त्यानें प्रेमपुर:सर

अर्पण केलें आहे.

दिनानाथ मोरेश्वर तळेकर,

राहणार–कल्याण.

# प्रस्तावना.

या जगांत आस्तिक नास्तिक आणि मध्यस्थ असे तीन प्रकारचे लोक आहेत. ज्यांस जें बरें वाटलें त्यावरच विश्वास ठेऊन ते स्वस्थ आहेत. दोन मतांतील खरें कोणतें याचा निर्णय करण्याचा आरंभ केला तर वादी प्रतिवादी प्रत्यक्ष असल्यास कधींच तंटा मोडणार नाहीं; ते प्रत्यक्ष नाहींत हेंच ठीक आहे. नास्तिक उद्योग प्रधान आहे असें ह्मणतात. आस्तिक दैव प्रधान आहे असें मानितात. मध्यस्थ तर उदासीन वृत्तीनें स्वस्थच बसले आहेत. ज्या मताचा विचार करूं लागावें, तेंच खरें आहे असें वाटतें; आणि कांहींच निर्णय न होतां मनुष्याच्या बुद्धीस विलक्षण मोह उत्पन्न होतो. याचें थोडें निराकरण करावें, असें मनांत आणून " दैवमंडन " अर्थात् नशीब आणि उद्योग हा विषय लिहिला आहे. यांत दैव प्रधान आहे असें प्रतिपादन केलें आहे. उद्योगासच प्रधान मानणारे असे पुष्कळ लोक आहेत, ज्यांस दैव हा पदार्थ काय याची ओळखही नाहीं, परंतु अशाही लोकांस कांहीं ठिकाणीं दैवच खरें आहे असें ह्मणण्याचा प्रसंग अवश्य येतो, व तेही त्यावेळीं तसें मानितात. परंतु प्रथम दैवाचें नांव सुद्धां घेतां उपयोग नाहीं. असो! उद्योगाच्या महत्वाचें ज्ञान सर्वांस आहेच; त्याचा विशेष विचार न करितां केवळ दैव ह्मणजे काय व तें कसें आहे, आणि त्यासच प्राधान्य कां

मानावें या संबंधानें येथें यथामति जितकें प्रतिपादन करितां आलें तितकें केलें आहे. यांत श्रीमद्भागवत, रामायण, भारत, गीता, देवीभागवत इत्यादि ग्रंथांचीं प्रमाणें लिहिलीं आहेत. व कितीएक विद्वन्मान्य कवींचीं वचनेंही प्रसंगोपात्त लिहिलीं आहेत. व सर्व शास्त्रांस मान्य असें जें वेदांतशास्त्र, त्या शास्त्राच्या आधारानें दैवासच प्राधान्य आहे व सर्व व्यवहार तदधीन आहेत, असा खरा सिद्धांत केला आहे. तरी जे उद्योगासच प्रधान मानणारे आहेत, त्यांसही हें पुस्तक वाचल्यानें दैववाद्यांचा मुद्दा व तत्व काय आहे हें सहज कळून येईल. दैव मानणारांसही प्रमाणबद्ध सविस्तर दैवाचें प्रतिपादन करतां येईल, या विषयीं विचार करणें नको. व मध्यस्थही उद्योगवाद्यांचें मत ध्यानांत ठेवून हें पुस्तक वाचील तर निदान आपले मनाशीं तरी मुद्देशीर निकाल करूं शकेल. तरी सर्वांनीं हा विषय एक वेळ अवश्य वाचून पाहिला असतां त्याचा खरा अंश कांहीं तरी मनांत आल्याशिवाय राहणार नाहीं. अशा उद्देशानें हा यत्न केला आहे. तरी ज्ञात्यांनीं हा विषय वाचून दोषाकडे लक्ष न देतां यांत जे गुण असतील त्यांचा स्वीकार करावा, अशी प्रार्थना आहे.

बापु विष्णु शास्त्री केळकर.

" लक्ष्मीवेंकटेश्वर " छापखाना, कल्याण.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# दैवमंडन.

## नशीब आणि उद्योग,

## या विषयाचा विचार.



**पूर्वजन्मजनितं पुराविदः कर्म दैवमिति संप्रचक्षते ।**
**उद्यमेन यदुपार्जितं चिराद्दैवमुद्यमवशं न तत्कथम् ॥**

अहो ! या जगांत ज्ञानी, अज्ञानी, श्रीमंत व गरीब असे अनेक प्रकारचे लोक आहेत. त्या सर्व लोकांच्या हिताकरितां त्रिकालज्ञ अशा थोर थोर ऋषींनीं शास्त्रेंही अनेक करून ठेविलीं आहेत. त्या शास्त्रांच्या अध्ययनानें पूर्ण ज्ञान झालें, म्हणजे कोणत्याही गोष्टीची शंका राहू नये, अशी व्यवस्था केली आहे. परंतु त्या शास्त्रांच्या खऱ्या अर्थाचा चांगला विचार झाला पाहिजे. तो न झाल्यामुळें अनेक प्रकारच्या शंका उत्पन्न होऊन, कोठेंही बुद्धीचा दृढ निश्चय होत नाहीं. त्यामुळें अनेकांचीं अनेक मतें ऐकून त्या त्या वेळीं तेंच मत खरें आहे असें भासतें. कांहीं काळानें दुसऱ्या विद्वानानें त्या मताचें खंडन करून, अन्यमत प्रतिपादन केलें म्हणजे पहिल्या मताचा पूर्ण विचार न झाल्यामुळें तेंही हळू हळू निघून जातें. आणि बुद्धीचा चंचलपणा तसाच राहतो. खरें काय, व खोटें काय, याचा निश्चय तरी कसा करावा? ज्या वस्तूचा खरी म्हणून स्वीकार केला आहे, ती खोटी आहे असें

वेदांतशास्त्रवेत्ते प्रतिपादन करितात. व्यवहारदृष्ट्या पाहिलें तर तें खरें आहे. त्यापासून आपलें कार्य होतें. मातीचा घट ( मडकें ) हा खोटा आहे, परंतु त्यापासून पाणी आणण्याची जी क्रिया होते, ती खोटी म्हणतां येत नाहीं. जर क्रिया खरी आहे, असें स्वीकारावें, तर दुसराच दोष येतो; म्हणजे कार्य खरें आणि कारण खोटें असें म्हणण्याचा प्रसंग येतो. सिद्धांत तर असा आहे कीं, ज्या कारणापासून जें कार्य उत्पन्न होतें तें त्या सारखेंच असतें. जसें सोन्यापासून झालेल्या दागिन्याचा सोनेपणा जात नाहीं. कोठें कोठें असेंही दृष्टीस पडतें कीं, कारण खोटें असून कार्य खरें. स्वप्नांत आपल्या शरीरास श्वानादिकां पासून पीडा होत आहे असें मानून ओरडतो, तो शब्द खरा आहे, आणि स्वप्न खोटें. तसेंच स्वप्नांत स्त्रीसंभोगादि जो व्यवहार होतो, त्यांत कांहींच खरें नाहीं, परंतु वीर्यपतन खरें आहे. हा अनुभव सर्वांसच आहे. अशा या वादग्रस्त गोष्टींचा विचार करण्याचा प्रसंग आला तर काय करावा? वैद्यशास्त्र, व्याकरण, अलंकार, ज्योतिःशास्त्र ग्रहणादि विषय इत्यादि शास्त्रें सर्वांच्या अनुभवास येणारीं जरी आहेत, तथापि त्यांतही विकल्प आहेच. अनेकांचीं अनेक मतें आहेतच. असें असूनही या शास्त्रांचा कांहीं अनुभव आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. तसा धर्मशास्त्र व वेदांतशास्त्र यांचा प्रत्यक्ष अनुभव कांहींच दाखवितां येत नाहीं. सर्व विचार करून पहातां जो विषय मनांत आणावा, त्यांत वाद आहेच. अनेक कल्पना आहेतच. सिद्धांताचें स्वप्नही नाहीं. जसा प्रसंग येईल तसा निर्वाह करावा, अशी लोकांची स्थिति आहे. पुष्कळ लोक ज्या मताचा स्वीकार करितात, तेंच मत खरें आहे, असें कांहीं लोक मानितात, व कांहीं मानित नाहींत. स्वानुभवास येईल तेंच खरें. त्यांतही

एकास जो अनुभव आला, तोच दुसऱ्यास येत नाहीं. अशा अनेक प्रकारच्या लोकांस निश्चय काय सांगावा व तो त्यांनीं कसा मानावा? एका गृहस्थानें एका विद्यार्थ्यास प्रश्न केला कीं, गोविंदा, तुझी परीक्षा उतरली काय? तेव्हां तो म्हणाला, महाराज, मीं तसाच अभ्यास केला म्हणून या स्थितीस आलों. उद्योगाशिवाय कधींच परीक्षा उतरणार नाहीं. हें ऐकून त्याच गृहस्थानें गोविंदाच्या मित्रास प्रश्न केला कीं, रामभाऊ, आपलें काय झालें? तेव्हां रामभाऊ कपाळास हात लाऊन म्हणाले, या ( नशीबा ) वांचून सर्व केलेलें व्यर्थ आहे. याची अनुकूलता असली म्हणजे कांहीं करावें लागत नाहीं. हरिपंत म्हणाले, रामभाऊ, तुम्हीं दोघे एकाच वर्गांत होतां, पाहिल्या पासून अभ्यास दोघांचाही सारखा; असें असून दोघांच्या फलांत अंतर पडलें, तेव्हां येथें नशीबाशिवाय दुसऱ्यावर कांहींच दोष ठेवितां येत नाहीं. दैव अनुकूल असलें म्हणजे सर्व गोष्टी चांगल्या होतात, यांत संशय नाहीं. हें ऐकून गोविंदा म्हणाला, हरिपंत, नशीब कशाचें? तसाच उद्योग केला म्हणजे सर्व गोष्टी चांगल्या होतात. उगीच नशीबावर हवाला ठेऊन स्वस्थ बसणाऱ्यास कांहींच लाभ होत नाहीं. आळशी लोक नशीबावर हवाला ठेऊन बसतात, आणि ते परिणामीं फसतात. उद्योग करणारास फळ मिळालेंच पाहिजे. रामभाऊनें माझ्या सारखा अभ्यास केला असता, तर परीक्षा उतरलीच असती. पाहिल्यापासून मीं नशीबाकडे कधींही लक्ष दिलें नाहीं. केवळ उद्योग हाच प्रधान असें मानून सर्व गोष्टी केल्या. असें त्यांचें बोलणें झालें. एकानें उद्योगास थोर मानिलें, व एकानें नशीबास थोर मानिलें.

आतां पहिल्यानें नशीब म्हणजे काय याचा विचार करूं. नशीब शब्दास संस्कृत भाषेंत पुष्कळ पर्याय आहेत. ते-दैव, दिष्ट, भागधेय, भाग्य, नियति, विधि व अदृष्ट असे आहेत. जें दृष्टार्थ नाहीं तें अदृष्ट. हे नांव अन्वर्थ आहे. यालाच सामान्यलोक प्रारब्ध म्हणतात, परंतु प्रारब्ध हा पर्याय शब्द थोडच्या निराळ्या अर्थाचा आहे. म्हणजे पुष्कळ रकमेंतून खर्चापुरती रक्कम बाहेर जाते वेळीं जशी काढून घ्यावी, तसेंच संचितांतून जन्मकालीं त्या जन्मापुरतें जें कर्म बरोबर आलें, व ज्या कर्मानें देहादिकांची प्राप्ति झाली; तेंच प्रारब्ध. या नशीबाचे तीन प्रकार आहेत. ते-संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण. संचितांतून एक जन्मापुरतें जे घेणें तें प्रारब्ध, म्हणजे साधारण लोक ज्यास नशीब म्हणतात.

आतां हें नशीब तरी कोणापासून उत्पन्न झालें, याला मूळ कोण? याचा विचार केला पाहिजे. एका कवीनें म्हटलें आहे कीं,-

**" पूर्वजन्मजनितं पुराविदः कर्म दैवमिति संप्रचक्षते ।**
**उद्यमेन यदुपार्जितं चिराद्दैवमुद्यमवशं न तत्कथम् ॥"**

( अर्थ-पूर्वजन्मांत जें कर्म म्हणजे क्रिया ( उद्योग ) केलें त्यासच ज्ञाते दैव असें म्हणतात. जें दैव उद्योगानें मिळविलें, तें उद्योगाच्या स्वाधीन कसें होणार नाहीं? ) या वाक्यावरून नशीबाचें पूर्वरूप उद्योग, आणि उद्योगालाच कांहीं कालांतरानें नशीब हें नांव मिळतें. विचार करून पाहिलें असतां यांत कांहीं दोष दिसत नाहीं. उद्योग करणें, हें दैवाशिवाय होत नाहीं. व दैव उद्योगापासूनच झालें आहे.

दैव आणि उद्योग हे दोन्हीं पदार्थ निरनिराळे मानिलेच पाहिजेत. एकाशीं एकाचा संबंध तर नित्यच आहे. जसें दुधाची परिणामस्थिति दहीं, हें निराळें नाहीं, असें म्हटलें तर लोकव्यवहारास विरुद्ध दिसतें. म्हणूनच निराळें असें मानिलें पाहिजे. व कांहीं भेदही स्वीकारणें आवश्यक आहे. तसेंच उद्योग आणि नशीब हीं निरनिराळीं आहेत. नशीब म्हणजे पूर्व जन्मांत केलेल्या कर्माचेंच नांव असें ठरलें. कांहीं उद्योगवादी चांगला विद्याभ्यास करून परीक्षा उतरल्यावर आपल्या उद्योगाचेंच वर्णन पुनः पुनः करितात. त्यांचें दैवाकडे मुळींच लक्ष नसतें. परंतु त्या प्रसंगांत कांहीं कमी जास्ती व्यवस्था झाली म्हणजे लोकांस सांगतात कीं, दैवापुढें कांहीं उपाय चालत नाहीं. पाहिजे ते उद्योग केले तरी सर्व व्यर्थ आहेत, असें सांगतात. परंतु त्यांतील खरें मर्म काय आहे, याचा सूक्ष्म विचार कांहीं करित नाहींत. प्रारब्धकर्माप्रमाणेंच उद्योग करण्याची वासना होते. व जो मनुष्य जें कर्म करितो, तें त्यास तसेंच प्राप्त होतें. एका कवीनें असें म्हटलें आहे कीं,–

**"यथा धेनुसहस्रेषु वत्सो विंदति मातरम् ।**
**तथा पूर्वकृतं कर्म कर्तारमनुगच्छति ॥"**

( अर्थ–जशा पुष्कळ गाई एके ठिकाणीं असल्या, तरी वत्स आपल्या आईकडे जातो. तसेंच पूर्वी केलेलें कर्म कर्त्याकडे येतें. ) आणि त्या योगानें सर्व चांगल्या किंवा वाईट गोष्टी सिद्ध होतात.

यांत असें सिद्ध झालें कीं, नशीब थोर आहे आणि उद्योग हा त्या नशीबाच्याच योगानें होतो. आतां; उद्योगांत कांहीं अर्थ नाहीं, तो

फुकट आहे, असें कोणीं म्हणूं नये. कारण तसें म्हणणें बरोबर नाहीं. केवळ उद्योगानेंच सर्व कार्यें होतात, असेंही मानणें नीट नाहीं. व केवळ नशीबावरच हवाला ठेऊन बसणें हेंही योग्य नाहीं. कांहीं थोर थोर ज्ञाते कर्मच प्रधान मानितात. विक्रमादित्याचे बंधु भर्तृहरि, परम वैराग्यशील, आपल्या नीतिशतकांत असें म्हणतात कीं,–

" यद्धात्रा निजभालपट्टलिखितं स्तोकं महद्वा धनं ।
तत्प्राप्नोति मरुस्थलेऽपि नितरां मेरौ ततो नाधिकम् ॥
तद्धीरो भव चित्त वत्स कृपणां वृत्तिं वृथा मा कृथाः ।
कूपे पश्य पयोनिधावपि घटो गृह्णाति तुल्यं जलम् ॥ "

( अर्थ–हे वत्सा चित्ता, धैर्य धारण कर. उगीच कृपण वृत्ति करूं नको. कारण ब्रम्हदेवानें जें आपल्या कपाळीं थोडें किंवा पुष्कळ धन लिहिलें आहे, तें आपण निर्जलदेशांत गेलों तरी आपल्यास प्राप्त होईल. मेरुपर्वतावर गेल्यानें अधिक मिळेल असें नाहीं. घट विहिरींत किंवा समुद्रांत सारख्याच पाण्याचें ग्रहण करितो. ) जें कांहीं होणें आहे तें प्रारब्धानुसार होतच आहे. त्यांत उद्योग केल्यानें कांहीं कमी जास्ती होईल, असें नाहीं. हें भर्तृहरीच्या वाक्यावरून स्पष्ट झालें. परंतु या वाक्यावर विश्वास ठेऊन बसणारांचा निर्वाह होईल काय? म्हणून जर कोणी प्रश्न केला, तर याचें उत्तर देण्याचा मोठा विचार आहे. स्वस्थ बसल्यानें निर्वाह होईल असें म्हटलें तरी कठिणच. कारण उद्योगास अगदींच अजागलस्तनाप्रमाणें व्यर्थत्व येऊं पाहतें. उद्योगच श्रेष्ठ मानावा तर दैववाद्यांचा तिरस्कार करावा लागतो, व एकाच प-

क्षाचा स्वीकार करून निर्वाह होणार नाहीं. दैव प्रधान आणि उद्योग त्याचें साधन असेंच मानिलें पाहिजे.

आतां दैवच खरें आहे, असा पक्ष स्वीकारिला तर त्यालाही पुष्कळ उदाहरणें आहेत, त्यांतून कांहींएक दाखविलीं पाहिजेत. पांडवांचा इतिहास बहुतकरून सर्वांस माहित आहेच. पांडव हे धर्म, इंद्र, वायु आणि अश्विनीकुमार यांचे पुत्र, क्षात्रविद्येंत परम निष्णात होते. ज्या पांडवांस भगवान् श्रीकृष्णाचें पूर्ण सहाय, एकापेक्षां एक अधिक प्रतापी, असें असून त्या पांडवांची अवस्था अशी व्हावी काय ! जो धर्मराजा आपले घरीं हजारों ब्राम्हणांस नित्य भोजन घालणारा, त्यानें कंकनामक ब्राम्हण होऊन विराटराजाचे घरीं सोंगट्या खेळून रहावें काय ! अहो ! अत्यंत बाहुबलशाली भीमानें पाकसिद्धि करून राहणें योग्य आहे काय ! धनुर्धरांमध्यें परमश्रेष्ठ, ज्यानें आपल्या बाहुबलानें शंकरास तुष्ट केलें, अशा जयशील अर्जुनानें षंढत्व स्वीकारून नृत्यगायनानें आपली जीविका करावी काय ! महासाध्वी द्रौपदी, जी द्रुपदराजाच्या यज्ञांत उत्पन्न झाली, तिनें राजपत्नीचें दास्य करणें योग्य आहे काय ! अहो, नकूलसहदेव परम ज्ञाते असून त्यांनीं गाई, घोडे यांच्या परीक्षेनें आपलें जीवन करावें काय! हा दुःखाचा प्रसंग पांडवांस केवळ दैवानेंच प्राप्त झाला, असें म्हणण्यास काय चिंता आहे. दशरथराजाचे पुत्र रामचंद्र यांनींही चौदा वर्षें वनवास केला. नलराजानें दमयंतीसह पुष्कळ दुःख भोगिलें. या तिन्हीं इतिहासांत सर्व प्रतापी, उद्योगशील असे असून त्यांस कष्ट भोगावे लागले. तेव्हां येथें दैवाशिवाय अन्य कल्पना काय करावी ? विद्यारण्यांनीं पंचदशींत असें म्हटलें आहे कीं,—

" अवश्यं भाविभावानां प्रतीकारो भवेद्यदि ।
तदा दुःखैर्न लिप्येरन् नलरामयुधिष्ठिराः ॥ "

( अर्थ–अवश्य होणाऱ्या गोष्टी कधीं चुकत नाहींत. जर चुकल्या तर नलराजा, रामचन्द्र व धर्मराजा यांनीं दुःखें कां भोगिलीं असतीं ?) दुःखाचा प्रतीकार करण्याचें सामर्थ्य त्यांस नव्हतें काय ? "**प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः** "( म्हणजे या शरीराबरोबर जें कर्म प्राप्त झालें आहे, त्याचा भोगावांचून क्षय होत नाहीं. ) तें भोगिलेंच पाहिजे. या वाक्यावरून कमी जास्ती उद्योगानें सुखदुःखाच्या भोगांत कांहीं फेरफार होत नाहीं, असें सिद्ध होतें. सर्व ठिकाणीं दैवानेंच फलप्राप्ति होते. विद्या व पराक्रम यांचा कांहीं उपयोग नाहीं. देवांनीं दैत्यांबरोबर संधि करून समुद्रमंथन केलें. त्यांत सर्वांस श्रम सारखे झाले किंबहुना दैत्यांनीं जास्ती श्रम केले, असें असून अमृतप्राप्ति देवांस झाली. राहू तर ठार मेलाच. दैत्य अत्यंत प्रतापी आणि उद्योगी असे असूनही त्यांना कांहीं लाभ झाला नाहीं. कोणी असें म्हणतील कीं, देवांस श्रीभगवंताचें सहाय होतें, त्यामुळें अमृत प्राप्त झालें. विष्णूनीं मोहिनीचें रूप धारण करून आपल्या दिव्यशरीराच्या हावभावकटाक्षांनीं दैत्यांस मोहित केलें, आणि देवांस अमृत पाजिलें. यांत प्रारब्धानें काय केलें ? त्यास उत्तर अध्यात्मरामायणांत असें सांगितलें आहे कीं,–

" **सुखस्य दुःखस्य न कोपि दाता परो ददातीति कुबुद्धिरेषा ।**
**अहं करोमीति वृथाभिमानः स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ॥** "

( अर्थ–सुख किंवा दुःख कोणी कोणांस देत नाहीं. दुसऱ्यापासून सुख

दुःख प्राप्त होतें, असें म्हणणें हेंच अज्ञान आहे. मीं हें केलें, आणि करीन इत्यादि म्हणणें हा फुकट अभिमान आहे. कारण सर्व लोक आपआपल्या कर्मपाशानें बद्ध आहेत.) कोणीं कोणाचें कांहीं कमी जास्ती करण्यास समर्थ नाहीं. जर मनुष्यास चांगलें वाईट करण्याचें सामर्थ्य असतें, तर सर्वच सुखी झाले असते. सर्वच द्रव्यवान्, विद्वान्, कुशल होऊन आनंदांत राहिले असते. धनप्राप्ति व्हावी आणि आनंदांत असावें, अशा विषयीं मनुष्याचे अनेक प्रयत्न चालले असतांही सर्वांस सारखी स्थिति मिळत नाहीं. जन्मापासून कांहीं उद्योग, श्रम न करितां हातभर उंचीच्या गादीवर बसून प्रियपत्नीनें प्रेमानें चांदीच्या वाटींत घालून आणून दिलेल्या श्रीखंडाच्या मधुर वड्या खात, व मनोहर वारांगनेचें गायन ऐकत जे आपला काळ आनंदांत घालवितात, त्यांच्या उद्योगावांचून सिद्ध झालेल्या सुखाची प्राप्ति सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत उद्योग करणारास होत नाहीं. ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाची आहे. सर्व दिवस उद्योगांत घालविणारास जें फल प्राप्त होत नाहीं, तें सर्वकाल उगीच बसून राहणाराला मिळतें. हा विषमभाव प्रत्यक्ष अनुभवास येत असतां, उद्योगच थोर आहे, असें म्हणण्यास थोडी तरी शंका वाटलीच पाहिजे.

मनुष्याच्या उद्योगानेंच जर नशीबांत फेरफार होता तर, पुष्कळ लोक त्या उद्योगास लागले असते. एकाच गुरूजवळ म्हणणारे विद्यार्थी एकाच वेळीं कांहीं काव्याचे श्लोक पाठ करण्यास आरंभ करितात, त्यांत एका विद्यार्थ्यास पन्नास किंवा साठ वेळां म्हणून श्लोक पाठ होतात; आणि दुसऱ्या विद्यार्थ्यास शंभरां पेक्षांही जास्त वेळां म्हटले तरी पाठ होत नाहींत. कदाचित् मोठ्या प्रयत्नानें पाठ झाले

तर महिना पंधरा दिवसांनीं विसरून जातात. प्रत्येक मनुष्यास थोरपणा व द्रव्य मिळविण्याची इच्छा सारखी असल्यामुळें समंजस विद्यार्थ्यांस यानें अभ्यासाकडे मन ठेऊन चांगली मेहनत केली नाहीं, असाही शब्द ठेवितां येत नाहीं. उद्योगवाद्यांस असा प्रश्न केला पाहिजे कीं, ज्याचा गायनाविषयीं कांहींच अंगस्वभाव नाहीं, त्यानें पुष्कळ उद्योग करून साधारण कांहीं शिकल्यावांचून अंगस्वभावानें गाणारा इतकें तरी गावें, त्यानें जर तसें गायन केलें, तर उद्योगच प्रधान असें म्हणण्यास थोडा आधार होईल. उद्योगानें सर्व गोष्टी होतात हें म्हणणें केवळ अविचाराचें आहे. कीर्तन करणारे हरिदास यांचीं मुलें रात्रंदिवस त्याच उद्योगांत असतात, तथापि कांहीं मुलें आपल्यास कीर्तनाचा उद्योग साधत नाहीं, असा निश्चय करून दुसऱ्या उद्योगानें चरितार्थ करितात. जर उद्योगानेंच मनांत आलेली गोष्ट सिद्ध होती, तर मग कोणास कांहींच अलभ्य झालें नसतें. वयानें प्रौढ, चांगले शहाणे, दुसरी कडे कोठेंही लक्ष न ठेवितां रात्रंदिवस अभ्यास करणारे वकिलीच्या परीक्षेस चार चार पांच पांच वेळ जाऊन परीक्षा उतरत नाहीं म्हणून परिणामीं कंटाळून तो नाद सोडून देतात. त्यांच्या उद्योगांत कांहीं कसर असते असें म्हणतां येईल काय? कारण प्रत्येक परीक्षेस रुपये भरावे लागतात. वर्षभर दुसरा विशेष उद्योग करण्यास वेळ सांपडत नाहीं. परीक्षा देऊन आल्यापासून अंतःकरणाच्या सर्व वृत्ति तिकडेच लागलेल्या असतात. चैन पडत नाहीं. अशीं आपलीं नुकसानें आळसानें कोण करील? खराच विचार करून पाहिलें तर चार चार वेळ जे परीक्षेस जातात, त्यांची जितकी तयारी असते तितकी प्रथमच परीक्षा उतरणाराची तयारी असण्याचा असंभव आहे. अशा

पुष्कळ गोष्टी वादग्रस्त आहेत. या भाषणावर उद्योगवादी असें म्हणतील कीं, चार चार वेळ परीक्षेस जातात, आणि परीक्षा उतरत नाहीं; त्यांची खरी मेहनत व उद्योग व्हावा तसा होत नाहीं, म्हणून परीक्षा उतरत नाहीं. हें त्यांचें म्हणणें कधींच संपणार नाहीं. फार तर काय, परंतु परीक्षेस बसणारेही प्रारब्धाशिवाय उद्योग करून तो सफल होत नाहीं, असें कबूल करितात.

नशीबाशिवाय सुखदुःखाची प्राप्ति नाहीं, अशा विषयीं श्रीमद्भागवतांत दशमस्कंधाच्या पूर्वार्धांत नंदाच्या घरीं श्रीकृष्णाच्या अनेक बाललीला चालल्या असतां, तो चमत्कार पाहून नंदयशोदा यांस जी सुखप्राप्ति झाली, ती वसुदेव देवकीसही नाहीं. मग इतरांस कोठून होणार? असा प्रसंग ऐकून राजा परीक्षितानें श्रीशुकाचार्यांस प्रश्न केला कीं,—

> **" नंदः किमकरोद्ब्रह्मन् श्रेय एवं महोदयम् ।**
> **यशोदा च महाभागा पपौ यस्याः स्तनं हरिः ॥ १ ॥**
> **पितरौ नान्वविंदेतां कृष्णोदारार्भकेहितम् ।**
> **गायंत्यद्यापि कवयो यल्लोकशमलापहम ॥ २ ॥ "**

( अर्थ—अहो शुकाचार्य, नंदानें असें थोर पुण्य काय केलें. आणि ज्या यशोदेचें स्तनपान श्रीकृष्णानें केलें, त्या यशोदेचें तरी असें थोर पुण्य कोणतें? मातापितरांस ज्या बाललीला मिळाल्या नाहींत, व जें लोकांच्या पातकांचें नाशन करणारें चरित विद्वान अद्यापि गात आहेत. ) असें बालचेष्टित ज्या नंदास प्राप्त झालें, त्यानें पूर्वजन्मांत काय पुण्य

केलें ? असें विचारिलें असतां शुकाचार्यांनीं सांगितलें राजा, अष्टवसु मध्यें थोर असा द्रोणनामक वसु धरानामक आपल्या पत्नीसह ब्रम्हदेवाची आज्ञा पालन करणारा, ब्रम्हदेवाजवळ जाऊन म्हणाला, महाराज, ज्याच्या भक्तीनें दुर्गतिपासून प्राणी मुक्त होतात. सर्व देवांत थोर विश्वेश्वर भगवान् जो विष्णु त्याचे ठिकाणीं माझी परम भक्ति असावी. असें ऐकून ब्रम्हदेवानें "**तथास्तु**" म्हणून सांगितलें. नंतर द्रोणनामक वसु व्रजामध्यें नंदनामक गवळी झाला. आणि त्याची पत्नी जी धरा ती यशोदा झाली. तेव्हां ब्रम्हदेवाचें वरप्रदान खरें करण्या करितां भगवान् मथुरेंतून व्रजांत येऊन नंदयशोदेस परम सौख्य दिलें. असा श्रीमद्भागवतांत इतिहास आहे.

आतां पुराणांतील जुने इतिहास सांगून त्यांचा कांहीं उपयोग नाहीं, असें वाचकांस वाटेल, तरी तसें वाटण्याचें कारण नाहीं. पूर्वजन्मांत जीं पापपुण्यें केलीं आहेत, त्याप्रमाणेंच त्यांची फलप्राप्ति या जन्मांत होते. या म्हणण्यांस बळकटपणा यावा म्हणून थोडा इतिहास सांगितला. आतां नवीन दृष्टीस पडलेला प्रारब्धाचा चमत्कार वाचकांपुढें ठेवितों. तिकडे चांगलें लक्ष ठेवावें. बडोद्यांतील प्रसिद्ध गणपतिभक्त रावसाहेब गोपाळराव मैराळ, ज्यास बडोद्याकडील सर्व लोक ओळखितात. ज्याचें नांव या देशांतही बरेंच प्रसिद्ध आहे. दान, धर्म चांगल्या रीतीनें करून सदाचरणानें वागणारे असे असून, त्यांस संतति नव्हती, या दुःखानें फारच त्रासले होते. त्यांजला कांहीं कालानें प्रारब्धयोगानें एक मुलगा झाला. त्यास महिना पंधरा दिवसांचे आंतच ज्वर येऊं लागला. तेव्हां हा नवकोटिनारायणाचा मुलगा, त्याच्या आ-

रोग्यार्थ वैद्य, मंत्री, अनुष्ठान करणारे असे लोक पुष्कळ त्या उद्योगास लागले होते. मोठ्या मेहेनतीनें तयार केलेल्या मात्रा वैद्य उगाळून देत होते. मंत्र्यांचे मंत्रप्रयोग चालूच होते, परंतु दिवसानुदिवस प्रकृति जास्त बिघडूं लागली. कोणाचा कांहीं उपाय चालेना. सर्व निराश झाले. तेव्हां रावसाहेबांनीं त्यांचें आराध्यदैवत जें गणपति, त्याची प्रार्थना करून म्हणाले कीं, हा मुलगा जर या दुखण्यांतून बरा झाला, तर पंचवीस हजारांचा धर्म करीन, असा संकल्प करून स्वस्थ राहिले. पुढें कांहीं कालानें प्रारब्धकर्माच्या नियमाप्रमाणें सर्व वैद्य, मंत्री, अनुष्ठान करणारे ब्राम्हण यांजला फसवून तो मुलगा आपले जड शरीर टाकून निघून गेला. ही गोष्ट पुष्कळ लोकांस माहित आहे. या ठिकाणीं उद्योगवाद्यांस उद्योग करून नशीबांत कांहीं फेरफार होतो कीं काय? असा प्रश्न केला तर काय उत्तर देतील. जर उद्योगानें नशीबांत फेरफार होतो हें खरें आहे, तर त्या मुलाच्या संबंधानें उद्योग करण्याचा आळस झाला, असें कोणीं म्हणेल काय? असें असून असा प्रसंग झाला. तेथील सर्व वैद्य व मंत्री वगैरे लोकांस स्पष्टपणें असें कबूल करावें लागलें कीं, नशीबांत फेरफार करण्यास मनुष्य समर्थ नाहीं. कोणत्याही कृत्यांत उद्योगानें फेरफार झाला असें जें वाटतें तें केवळ अज्ञान आहे. उद्योग करण्याची वासना होणें ती नशीबाशिवाय होत नाहीं. असाच दृढ निश्चय ठेवावा. एका कवीनें म्हटलें आहे कीं,–"बुद्धिः कर्मानुसारिणी" नशीब असें चमत्कारिक आहे कीं, दिसण्यांत अगदीं साधारण असे जे विषय आहेत, तेही नशीबावांचून मिळत नाहींत. याला असा दृष्टांत आहे

कीं, नाटकांत जाऊन राजाचें सोंग घेऊन तरी राजा व्हावें, असें जरी मनांत आणिलें, तरी तें सिद्धीस जाणें नशीबाशिवाय कठिणच. म्हणजे नाटकांत जाणारा मनुष्य चांगला रूपवान, मनोहर भाषण करणारा, थोडें बहुत गाण्याचें ज्ञान असून कंठमाधुर्ययुक्त असा असला पाहिजे. ही योग्यता असल्यावांचून नाटकांतील राजाचाही अधिकार मिळत नाहीं. मग प्रत्यक्ष राजा होणें तर फार दूर आहे.

आतां कोणी उद्योगवादी असें म्हणेल कीं, ज्या गोष्टी राजा होण्यास अवश्य असतील, त्या त्यानें उद्योगानें साध्य करून घ्याव्या. परंतु त्या उद्योगानें कधींच मिळणाऱ्या नाहींत. म्हणजे कितीही उद्योग केला तरी स्वरूपांत फेरफार करितां येत नाहीं. स्वभावतः कठोर भाषण करणाऱ्याच्या भाषणांत मृदुपणा आणणें हें उद्योगानें दुःसाध्य आहे. ज्याला स्वभावतः वक्तृत्वशक्ति नाहीं, त्याला उद्योगानें थोडी बहुत आली तरी जो स्वभावशूर आहे, त्याची बरोबरी करण्यास तो कधींही समर्थ होणार नाहीं. गुरूकडे जाऊन अभ्यास केला म्हणजे सर्व विद्या येतात. परंतु त्यांत चांगला, वाईट, मध्यम ह्या कोट्या आहेतच. त्या चांगला उद्योग केला तरी नाहींशा होत नाहींत. कोणत्यातरी एका विद्येंत एक निपुण होतो. त्यालाच दुसरी विद्या तशीच करावयास सांगितली तर त्यानें कितीही प्रयत्न केला तरी तो त्यांत निपुण होत नाहीं. कांहींतरी व्यंगता राहते. कितीही चांगला गुरू असला तथापि विद्यार्थ्याच्या बुद्धींत फेरफार करितां येत नाहीं. भवभूतीनें आपल्या उत्तररामचरित्रांत म्हटलें आहे कीं,–

" वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे ।
नतु खलु तयोर्ज्ञाने शक्तिं करोत्यपहंति वा ॥
भवति च पुनर्भूयान् भेदः फलं प्रति तद्यथा ।
प्रभवति शुचिर्बिंबोद्ग्राहे मणिर्न मृदां चयः ॥ "

( अर्थ-गुरु बुद्धिमान शिष्याला जशी विद्या सांगतो, तशीच बुद्धिहीनास सांगतो. त्यांची जाणण्याची शक्ति वाढवीत नाहीं, किंवा नाहींशी करीत नाहीं. परंतु दोघांच्या फलप्राप्तींत फारच अंतर पडतें. दोघांसही शिकविणारा सारखा असतां असें होण्याचें कारण काय? तें सांगतात. निर्मल म्हणजे स्वच्छ असा जो मणि म्हणजे स्फटिक किंवा कांच, हा प्रतिबिंबाच्या ग्रहणास जसा समर्थ होतो, तसा मातीचा ढीग होत नाहीं. ) म्हणजे स्फटिकादि लखलखीत पदार्थांत सहज कोणत्याही वस्तूचें प्रतिबिंब दिसतें, तसें भूमीवर दिसत नाहीं. याचप्रमाणें बुद्धिमान् शिष्य गुरूनें सांगितलेल्या विद्येचें सहज ग्रहण करितो. तसें बुद्धिहीनास होत नाहीं.

बुद्धिही तीन प्रकारची आहे. तैलबुद्धि, चर्मबुद्धि, ऊर्णाबुद्धि. तैलबुद्धि म्हणजे जसा तेलाचा एक बिंदु पाण्यांत टाकिला म्हणजे तो चोहींकडे पसरतो, आणि सर्व पाणी व्यापून टाकितो. त्याप्रमाणें गुरूनें थोडें ज्ञान सांगितलें म्हणजे तें ऐकून ज्याची बुद्धि त्या विषयांत चोहींकडे प्रवीण होते, तो तैलबुद्धि. चर्मबुद्धि म्हणजे कातड्यांत दाभण टोंचून जेवढें छिद्र पाडावें तेवढेंच राहतें. कमी जास्ती होत नाहीं. त्याप्रमाणें गुरूनें जितकें ज्ञान सांगितलें असेल

तितक्याचेंच ग्रहण करून राहणारा, त्यांत कमी जास्ती कांहीं कल्पना नाहीं, व सांगितलेल्या ज्ञानाचा नाशही नाहीं; तो चर्मबुद्धि. ऊर्णाबुद्धि म्हणजे, ऊर्णा म्हणजे लोंकर बुरुणूंस इत्यादि. त्यांत दाभण किंवा सुई टोंचिली असतां जोंपर्यंत त्यांत तो आहे तों पर्यंत तें छिद्र कायम असतें. त्यांतून दाभण काढिला म्हणजे पुनः बुरुणुसाची पूर्वस्थिति होते. त्याप्रमाणें गुरू सांगत आहेत तोंपर्यंत आठवण, पुढें कांहींच नाहीं. असा जो बुद्धिचा धर्म आहे, त्यांत फेर बदल करितां येत नाहीं. कांहीं लोक असे हौशी आहेत कीं, बारा बारा वर्षें नाटकांत असतात, परंतु तेथील अधिकारांत कांहीं बदल नाहीं. जो भालदार चोपदाराचें काम करणारा, त्याला कधींही राजाचें काम करितां येत नाहीं. जो दासीचें सोंग घेणारा तो कधींही राजपत्नी होण्यास योग्य होत नाहीं. लोकांची समजूत अशी आहे कीं, नाटकांत जाऊन सोंग घेणें म्हणजे अगदीं हलकें कृत्य आहे, परंतु सूक्ष्मरीतीनें पाहिलें असतां पुष्कळ जनसमूहांत भाषण करणें फार कठीण आहे. तें प्रारब्धाच्या अनुकूलतेशिवाय चांगलें लोकमान्य होईल असें वाटत नाहीं. तें कृत्य अगदींच स्वल्प असतें तर सर्वांस आलें असतें. ज्यापेक्षां सर्वांस साधत नाहीं, त्यापेक्षां त्यांत कांहीं तरी काठिन्य आहेच.

स्वरूपादि सर्व स्थिति चांगली मिळणें हें प्रारब्धाधीन आहे, असें म्हणण्यास काय अडचण आहे. कारण सर्व शरीरादि स्थिति चांगली मिळाली म्हणजे अर्थातच त्या पुरुषास प्रयासावांचून सुखप्राप्ति होते. याकरितां आपलें नशीब जर चांगलें नाहीं, तर दुसऱ्यावर उगीच शब्द ठेविण्यांत काय अर्थ आहे? एका कवीनें असें म्हटलें आहे कीं,-

" पत्रं नैव यदा करीरविटपे दोषो वसंतस्य किं ।
नोलूकेन विलोक्यते यदि दिवा सूर्यस्य किं दूषणम् ॥
धारा नैव पतंति चातकमुखे मेघस्य किं दूषणं ।
यद्धात्रा निजभालपट्टलिखितं तन्मार्जितुं कः क्षमः ॥ "

( अर्थ–वसंतकालांत सर्व झाडांस पानें येतात, परंतु करीरास ( कारवीस ) येत नाहींत, याचा दोष वसंतास लावून काय उपयोग. सूर्याच्या प्रकाशानें सर्व पदार्थ प्रकाशित झाले म्हणजे उलूकास कांहींच दिसत नाहीं, हें दूषण सूर्यास द्यावें काय? मेघ सर्व प्राण्यांस उदकानें संतोषित करितो, परंतु चातकाच्या तृषेचा नाश होत नाहीं, हें दूषण मेघास देऊन काय उपयोग आहे. विधात्यानें आपल्या दैवास अनुसरून जें कपाळीं लिहिलें आहे, तें चुकविण्यास कोणींही समर्थ नाहीं. ) दशरथराजाची प्रियपत्नी जी कैकयी तिनें आपला पुत्र जो भरत, त्याला राज्यप्राप्ति व्हावी आणि आपण मोठ्या आनंदांत असावें, अशाविषयीं पुष्कळ उद्योग केला कीं, ज्या उद्योगानें तिला " कुलकलंकिनी " म्हणजे कुलास कलंक लावणारी असें नांव मिळालें. सर्व सुखाचा लाभ ज्यापासून होणारा तो पति राजा दशरथ मृत झाला. नंतर भरत घरीं आल्यावर त्याजला सर्व वर्तमान समजलें, तेव्हां तो तिचा वध करण्यास तयार झाला. परंतु आपला बंधु रामचंद्र हिला मातोश्री असें म्हणतो, असा मनांत विचार करून तिचा वध केला नाहीं. आणि तिच्या वाक्याचा तिरस्कार करून रामचंद्राकडे निघून गेला. तेथें जाऊन रामचंद्रास सर्व वर्तमान सांगून शेवटीं रामाच्या पादुका घेऊन त्यांची सेवा करून नंदिग्रामीं राहिला.

आपल्या पुत्रास राज्य मिळावें म्हणून कैकयीनें पुष्कळ उद्योग केला, परंतु त्या उद्योगानें लाभ न होतां हानी मात्र झाली. नशीबांत कांहीं बदल झाला नाहीं. पूर्वी रामचंद्रास राज्याभिषेक करण्याविषयीं दशरथ राजानें पुष्कळ त्वरा केली, व सर्वांसही ती गोष्ट मान्य होती, असें असून राजाचा तो हेतू पूर्ण न होतां रामाच्या वियोगानें प्राणत्याग केला. अशा गोष्टींचा विचार केला म्हणजे दैवांत फेरबदल होतो किंवा नाहीं, याचा निर्णय सहजच होतो. कोणीं असें म्हणेल कीं, बालपणीं चांगला उद्योग करून विद्या संपादन केली म्हणजे पुढें चांगली योग्यता वाढून हजार रुपये दरमहा मिळतो. तेव्हां उद्योगानेंच नशीबांत फेरबदल झाला, असें म्हणण्यास काय चिंता आहे ? या प्रश्नाचें असें उत्तर आहे कीं, बालपणांत चांगल्यारीतीनें वागून उत्तम विद्याभ्यास करावा, अशी बुद्धि होणें हें उद्योगानें होत नाहीं. पूर्वजन्मार्जित प्रारब्धानें जसा योग घडणें असेल, तशी बुद्धि होऊन उद्योग होतो. मुलगा जन्मला म्हणजे त्याचा जन्मकाल खरा सांपडून त्याजवरून जर ज्योतिःशास्त्राप्रमाणें पत्रिका तयार केली, आणि चांगल्या सूक्ष्मविचारानें पाहिलें, तर तो मनुष्य कसा होईल याची पूर्णस्थिति जरी सांगतां आली नाहीं, तरी साधारण रीतीनें कोणत्या योग्यतेचा होईल, आणि कोणत्या उद्योगानें आपला निर्वाह करील, इत्यादि गोष्टी सांगतां येतात. तेव्हां त्याच्या प्रारब्धानेंच ठरलेली गोष्ट योग्यकाळीं अनुभवास आली, व त्या प्रमाणेंच उद्योगाची वासना होऊन सर्व गोष्टी सिद्ध झाल्या. यांत उद्योगानेंच दैवांत फेरबदल झाला असें म्हणतां येत नाहीं. दैवानें पुढें होणारी स्थिति समजून त्या स्थितींत जेव्हां उद्योगानें फेरबदल झालेला दृष्टीस पडेल, तेव्हां तसें म्हणतां येईल !

आतां दैवानें पुढें होणाऱ्या स्थितीचें खरें ज्ञान होण्याचें साधन ज्योतिःशास्त्र असें सांगितलें. त्या ज्योतिःशास्त्राविषयीं मोठेच वाद-विवाद पूर्वापार चालत आले आहेत. त्याजवर विश्वास तरी किती ठेवावा, हें कळत नाहीं. जोशीबुवांनीं पत्रिकेवरून सांगितलेल्या कांहीं गोष्टी खऱ्या होतात, व कांहीं अगदींच खोट्या होतात. त्या-मुळें पूर्ण विश्वास ठेवितां येत नाहीं. कांहीं लोक तर ज्योतिःशास्त्रा-प्रमाणें सूर्यचंद्राचें ग्रहण स्पष्ट दिसत असल्यामुळें सर्व ज्योतिःशास्त्र खो-टें असें म्हणत नाहींत. फलग्रंथ मात्र खोटे आहेत. यांचा कांहींच अनुभव नाहीं, व यांजवर विश्वास ठेऊन बसणें अगदीं अयोग्य आहे; असा सिद्धां-त करून बसले आहेत. त्यांच्या जवळ " दैवानें होणाऱ्या पुढील गो-ष्टींचें अनुमान ज्योतिःशास्त्रानें करितां येतें " असें म्हणतांही येत नाहीं. तेव्हां ज्यांनीं ज्या शास्त्राचा अनुभव येत नाहीं म्हणून त्याग केला, तेंच शास्त्र कांहीं प्रमाण दाखविण्या करितां त्यांजपुढें नेणें हें बरोबर नाहीं, अशी कोणीं शंका घेतील. त्यांस युक्तीनें असा प्रश्न केला पाहिजे कीं, ज्योतिःशास्त्र खरें नाहीं असा जर आपला पूर्ण निश्चय आहे, तर मुलगा किंवा कन्या यांच्या लग्नाच्या वेळीं हातांत कुंडल्या घेऊन जोशीबुवांचे घरीं जाण्यायेण्यांचे आपल्या पायांस श्रम कां देतां? आणि अप्रमाणशास्त्रानें सांगितलेल्या मंगळादिकांवर विश्वास ठेऊन हुंड्याच्या दोन हजार रुपयांस पाणी कां सोडितां? एकनाडी, मनुष्य राक्षसगण, मृत्युषडष्टक येतें, त्यामुळें हें लग्न अकर्तव्यांत आहे. अशा खोट्या ज्योतिःशास्त्रवेत्त्यांच्या बडबडीनें आपला झालेला संकल्प कां मोडितां? मुलीचें आश्लेषा नक्षत्र असलें म्हणजे तें सासूला वाईट या कारणानें तें स्थळ सोडून देतां. कांहीं प्रकृतीस विशेष विकार

झाला आणि वैद्य औषधें देऊन कंटाळले, म्हणजे हळूच जोशीबुवांस बोलावून आणून ग्रह कसे काय आहेत ते पहा. जो उपाय करावा त्यापासून कांहीं कमी होत नाहीं. दिवसानुदिवस प्रकृति जास्त बिघडत चालली आहे. असें वर्तमान सांगितल्यावर जोशीबुवा कुंडली पाहून सांगतात, रावसाहेब, आपल्यास हल्लीं साडेसाती आहे. शनी बारावा असून जन्मकालीं वाईट असल्यामुळें आपल्या शरीरास फार पीडा होत आहे. मंगळ तर कुजस्तंभ असल्यामुळें सहा महीनें एकाच राशीस बसला आहे. तोही आपल्यास बारावा आहे. या करितां आपण कांहीं जप, दानें इत्यादि करावें, म्हणजे थोडें आरोग्य होईल. असें ऐकून तत्काल ती सर्व तजवीज करण्याविषयीं निश्चय करून दुसरे दिवशीं जोशीबुवांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व केल्यावर शनैश्चर मंगळ इत्यादिकांची थोडी कृपादृष्टि होऊन, प्रकृतीस कांहीं आराम पडूं लागतो. असें झालें म्हणजे मग त्या दिवसापासून ज्योतिःशास्त्र खरें आहे, आजपर्यंत आम्हीं आपल्या अज्ञानानें खोटें म्हणत होतों, परंतु हें म्हणणें अगदीं व्यर्थ आहे. असा दृढ निश्चय होतो. आणि पुढें कोणतेंही कृत्य करणें झालें तरी ग्रह पाहिल्याशिवाय करावयाचें नाहीं, असें ठरतें. आणि ज्योतिःशास्त्र खरें आहे असें इतरांसही सांगतात. एकदां अप्रमाण शास्त्र ठरल्यावर मग पुनः तिकडे वळून पहाणें बरोबर नाहीं. तसा निश्चय तर होत नाहीं. मिळून जसा लग्नादि कृत्यांत ज्योतिःशास्त्राचा स्वीकार केला, तसा प्रारब्धकर्मानें पुढें होणाऱ्या गोष्टी साधारणरीतीनें ज्योतिःशास्त्रानें कळतात, असा निश्चय करून त्याप्रमाणें वर्तन करावें, म्हणजे प्रारब्धांत उद्योगानें फेरबदल होतो किंवा नाहीं, हें स्पष्ट होईल.

आतां ज्योतिःशास्त्राच्या संबंधानें दोन पृष्ठें खर्ची घातलीं. हा विषय कांहीं एक आधुनिक विद्वानांस मान्य होणार नाहीं. कारण त्यांचाही ग्रह ज्योतिःशास्त्राविषयीं वर सांगितल्या प्रमाणेंच आहे. असो,सर्वांच्या मनाप्रमाणेंच भाषण करावें, असा विचार केला तर कोणताही एक सिद्धांत मुळींच होणार नाहीं. प्रस्तुत चाललेला नशीब आणि उद्योग हा विषय पूर्वींपासूनच अत्यंत वादग्रस्त आहे. उद्योग थोर किंवा प्रारब्ध थोर याचा एक सिद्धांत कोठेंही दिसत नाहीं. जेथें जेथें पहावें तेथें तेथें (उद्योगवादी म्हणतो उद्योग थोर आहे, कर्मवादी म्हणतो कर्मच थोर आहे.) उद्योगाविषयीं हजारों दृष्टांत मिळतील व कर्माविषयीं तर पुष्कळ ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे. त्यांतून मींही येथे कर्मवाद्याचा पक्ष घेऊन पुष्कळ उदाहरणें लिहिलीं आहेत. त्यांत नशीबाचें मंडन केलें आहे. व उद्योगानें नशीबांत फेरबदल होत नाहीं, असेंही स्पष्ट सुचविलें आहे.

आतां संगति आणि उद्योग यांचा संबंध नशीबाशीं किती असतो, याचा विचार केला पाहिजे. " **उद्यमेन यदुपार्जितं चिराद्दैवमुद्यमवशं न तत्कथम्** "( अर्थ–जें नशीब उद्योगानेंच मिळविलें तें उद्योगवश कसें होणार नाहीं?)हें पूर्वीं सांगितलें आहे. यावरून उद्योग आणि नशीब यांचा संबंध निरंतर आहेच. [1]कर्मवाद्याचा पक्ष घेऊन मागें कर्मच थोर आहे, असें ठरविलें आहे. परंतु त्यांत उद्योग हा कर्माचा नाशक, किंवा साधक याचा कांहींच सिद्धांत केला नाहीं. त्याचा विचार आतां केला पाहिजे. जी गोष्ट नशीबानें सिद्ध होणारी नसते,

---

[1] जेथें जेथें कर्म असा शब्द येतो तेथें तेथें त्याचा अर्थ नशीब असाच समजावा.

त्या ठिकाणीं उद्योगानें कांहीं साध्य होत नाहीं. आणि जी गोष्ट कर्मानें अवश्य होणारी आहे, त्या गोष्टीचें उद्योग हें अंग आहे. आणि नशीव अंगी ( प्रधान ) आहे. जसें भोजन हें अंगी आणि कोशिंबिरी, भाज्या इत्यादि त्याचीं अंगें आहेत. तसेंच नशीब हें अंगी आणि उद्योग हा त्याचें अंग आहे. आतां कर्मवाद्यास असें सांगितलें पाहिजे कीं, केवळ नशीबावर हवाला ठेऊन चालणार नाहीं. थोडा तरी उद्योग करावा लागेल. व तो केल्याशिवाय कार्यसिद्धि होणार नाहीं. उद्योगास स्वतंत्रपणा नाहीं. तो प्रारब्धाधीन आहे. याला दृष्टांत असा कीं, एका मोठ्या अधिकाऱ्याकडून आपल्यास पुष्कळ दरमहा मिळणारी जागा मिळावी, अशी शिफारस मिळाली आहे. ( ही प्रारब्धासारखी) व तें काम खात्रीनें होणारें आहे. परंतु त्या अधिकाऱ्याकडे जाऊन त्याजला भेटून जेव्हां आठवण करावी आणि सांगावें कीं, रावसाहेबांनीं आपल्यास ज्याच्याविषयीं सूचना केली होती, तोच मीं आपल्याकडे आलों आहें. तरी इच्छानुरूप गरीबाची तजवीज व्हावी. असें सांगून त्याजला आनंद वाटेल अशी थोडी स्तुति वगैरे केली म्हणजे आपलें काम सहजच होतें. या कार्यसिद्धींत मोठ्या अधिकाऱ्याकडून काम होण्याबद्दल शिफारस झाल्यामुळें कार्यसिद्धि होणारच होती. परंतु कामदाराकडे जाऊन भेटण्याचा उद्योग करावाच लागला. आणि पूर्वींच प्रारब्धानें सिद्ध असलेला लाभ आपल्यास झाला. याप्रमाणें प्रारब्धाची अनुकूलता असून त्याच्याच प्रेरणेनें उद्योग केला म्हणजे त्या योगानें कार्याची सिद्धि होते. ती सिद्धि कोणीं उद्योगानें झाली असें मानितो, कोणीं प्रारब्धानें झाली असें म्हणतो, कोणीं शिफारस करणाऱ्या मित्राकडून झाली असें मानितो. सिद्धि झाली नाहीं म्हणजे

कोणासही कांहींच शब्द न ठेवितां पुनः प्रारब्ध खरें आहे त्यावांचून केलेले सर्व उद्योग व्यर्थ आहेत असें मानितो.

कोणीं अशी शंका घेईल कीं, प्रारब्धानें सर्व गोष्टी होतात, मग उद्योग करण्याचें कारण काय ? उद्योगाचा त्याग करून स्वस्थ बसावें, तर तसें मुळींच होणार नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेच्या तृतीयाध्यायांत भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें आहे कीं,-

**" न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥"**

( अर्थ-अर्जुना, कोणीं कधीं क्षणभरही कर्म केल्याशिवाय रहात नाहीं. सत्व, रज आणि तम हे प्रकृतीचे तीन गुण प्रारब्धाधीन असणाऱ्या प्राणिमात्राकडून कर्म करवितात. तें कर्म करण्याविषयीं किंवा न करण्याविषयीं मनुष्य स्वतंत्र नाहीं. प्रत्येकास असें वाटतें कीं, हें काम मीं मोठ्या यत्नानें केलें, आळशा सारखा बसून काळ घालविला नाहीं; म्हणूनच या योग्यतेस आलों. परंतु हा उद्योग मीं केला आणि हें कार्य माझ्या उद्योगानेंच सिद्धीस गेलें, हें म्हणणेंच मूल अज्ञान आहे. कदाचित् लौकिक व्यवहारास अनुसरून असें म्हणावें, परंतु आपल्या मनांत असाच निश्चय ठेविला पाहिजे कीं, उद्योग करणें हें एक प्रकारचें लोकापवाद दूर करण्याचें साधन आहे. खराच विचार केला तर अमुक कार्य सिद्ध होण्याकरितां हा उद्योग केला पाहिजे, म्हणजे कार्यसिद्धि होईल, असें निश्चयानें म्हणतां येत नाहीं. प्रारब्धाच्या प्रेरणेनेंच उद्योगाची वासना होते. आणि वासनेप्रमाणें उद्योग केला म्हणजे त्या कार्याची सिद्धि होते. यांत कांहीं संशय नाहीं.

जसा उद्योग आणि प्रारब्ध यांचा संबंध आहे, तसाच संगति आणि प्रारब्ध यांचाही संबंध आहेच. जसा प्रारब्धाचा योग असेल तशी संगती मिळते. आणि त्या संगतीच्या योगानें इच्छा पूर्ण झाली असें वाटतें, परंतु संगती मिळणें हें प्रारब्धाधीन आहे. चांगल्या संगतीनें आपलें खचितच हित होतें, असा जर सिद्धांतच ठरला तर आपल्यास विशेष यत्नाशिवाय इच्छा पूर्ण करून घेण्याचें एक मोठें साधनच झालें असें म्हटलें पाहिजे, व हें सर्वांस होण्याजोगें आहे. तें केलें म्हणजे सर्वांची चिंता दूर होईल, आणि सर्व सुखी होतील.कोणांसही दुःख भोगण्याचें कारण नाहीं. असा तर अनुभव नाहीं. चांगली संगति असून उद्योग चांगल्या मेहनतीचा असतांही कार्यसिद्धि होत नाहीं. प्रारब्धाचेंच अवलंबन करून स्वस्थ बसावें लागतें. असे पुष्कळ दृष्टांत मिळतील. श्रीमद्भागवताच्या षष्ठस्कंधांत श्रीशुकाचार्यांनीं परीक्षित राजास वृत्रासुराच्या पूर्वजन्मसंबंधी इतिहास सांगितला आहे, तो असा कीं, शूरसेन देशांत चित्रकेतु नांवाचा एक राजा होता. तो सार्वभौम असून राजनीतीला अनुसरून चालणारा होता. त्या राजाला एक कोटि स्त्रिया होत्या, तथापि त्या स्त्रियांतून एकीसही संतति झाली नाहीं. कारण राजाच्या प्रारब्धानें त्या सर्वच वंध्या मिळाल्या. राजा पुत्रोत्पादनाविषयीं समर्थ होता. संतति नसल्यामुळें राजा रात्रंदिवस चिंताक्रांत असे. असा कांहीं काळ गेल्यावर एके दिवशीं त्रिकालज्ञानी अंगिरानामक मुनि तेथें आले.त्यांची पूजा वगैरे करून त्यांजला राजानें संतोषित केलें. तेव्हां मुनीनीं राजाचा अभिप्राय जाणून तेथें यज्ञ करून यज्ञावशेष राजाच्या श्रेष्ठ पत्नीस दिला. आणि भक्षण करावा अशी आज्ञा करून जाते वेळीं राजास सांगितलें कीं, राजा,तुला सुख आणि दुःख देणारा

असा पुत्र होईल, असें सांगून मुनी निघून गेले. नंतर कांहीं काळानें राजपत्नी गरोदर झाली. नऊ मास पूर्ण होतांच पुत्र झाला. त्यामुळें राजास फारच आनंद होऊन पुत्राचे जातकर्मादि संस्कार केले. ब्राम्हणांस पुष्कळ धर्म केला. पुढें चित्रकेतु राजाची प्रीति दिवसानुदिवस ज्येष्ठ पत्नी जी कृतद्युती तिजवर विशेष होऊं लागली. हें पाहून त्या सर्व स्त्रिया आपल्या मनांत खिन्न होऊन त्यांनीं विचार केला कीं, कृतद्युतीला पुत्र झाल्यामुळें राजाचें प्रेम अधिकाधिक वाढत चाललें, हें बरोबर नाहीं. कांहीं तरी उपायानें या पुत्राचाच नाश केला म्हणजे पूर्वीप्रमाणें सर्व गोष्टी होतील. असा निश्चय करून त्या पुत्रास विष घातलें, आणि त्या दुष्टस्त्रियांनीं त्याचा प्राण घेतला.तो भयंकर प्रसंग कृतद्युतीस कळतांच फार दुःखित होऊन तिनें दीर्घस्वरानें रोदन करण्यास आरंभ केला. राजवाड्यांत चोहींकडे सर्व परिजन दुःखित झाले. चित्रकेतूनें फार शोक केला. अशा त्या घोरप्रसंगांत कोणीं कोणास काय उपदेश करावा ? प्रधानादिकांनीं सावध होऊन राजास पुष्कळ समजुतीच्या गोष्टी सांगितल्या, तथापि त्याचा शोक दूर होईना. इतक्यांत तेथें नारद आणि अंगिरा नामक मुनि आले, आणि राजास चार वेदांताच्या गोष्टी सांगून त्या शोकांतून मुक्त करून पुढें त्याजला एक मंत्र देऊन देवतेचें आराधन करण्यास सांगितलें. तो तें सर्व कृत्य करून देवतेच्या प्रसादानें दिव्यविमानांत बसून स्वैरगतीनें फिरूं लागला. राजाच्या सर्व स्त्रिया बालहत्येचें प्रायश्चित्त करून स्वस्थ बसल्या. तात्पर्य, पुष्कळ प्रयत्नानें संगति चांगली मिळाली, तथापि दैवांत कांहीं कमी जास्त करितां येत नाहीं, हें सिद्ध झालें.

आतां नशीब हा पदार्थच नाहीं, असा पक्ष जर कोणीं स्वीकारिला तर

त्या पक्षाच्या स्वीकारानें वेद, शास्त्र, पुराण, धर्मशास्त्र यांचा त्यागच केला असें समजलें पाहिजे. नशीब आणि उद्योग या विषयाच्या निबंधांत वेदांतशास्त्राची सत्यता जर मानिली नाहीं तर नशीब या शब्दाचा अर्थ काय? याचें उत्तर सांगणें फार कठीण आहे. वेदांतशास्त्र खरें आहे असें मानून जर या विषयाचा चांगला विचार केला, तरच शास्त्ररीतीनें याचा निर्णय होईल. नाहींपेक्षां नशीब हें काय व याची उत्पत्ति कोठून? हें खरें किंवा खोटें? असा प्रश्न केला तर जे शास्त्राचा स्वीकार करीत नाहींत, त्यांजला याचें उत्तर देण्यास कांहींच प्रमाण नाहीं. नशीब हा एक कांहीं तरी परंपरेनें चालत आलेला शब्द आहे. यांत कांहींच अर्थ नाहीं, असें मानिलें म्हणजे पाप, पुण्य, जन्म, मरण इत्यादि सर्वच प्रकार नाहींसे झाले, असें म्हटलें पाहिजे. मनास वाटेल तसें वागावें. पाहिजे तसें धर्माचरण करावें. पुराण धर्मशास्त्र वेदांतशास्त्र हीं नावें शशशृंग, मृगजल इत्यादि शब्दांप्रमाणेंच निरर्थक झालीं. पाप करणारास अमुक पातकानें अमुक जन्माची प्राप्ती होते, अशीं जीं पुराणवाक्यें त्यांस विरोध येतो. गरुडपुराणांत गरुडानें भगवंतास प्रश्न केला कीं, देवा, कोणत्या पातकानें कोणता जन्म येतो हें सांगा, व त्या पातकाचें चिन्ह त्या पुरुषावर काय असतें तेंही समजलें पाहिजे? असा प्रश्न ऐकून भगवंतांनीं सांगण्यास आरंभ केला.

## श्रीभगवानुवाचः-

"यैः पापैर्यांति यां योनिं पापिनो नरकागताः ।
येन पापेन यच्चिह्नं जायते मम तच्छृणु ॥ १ ॥

ब्रह्महा क्षयरोगी स्याद्गोघ्नः स्यात् कुब्जको जडः ।
कन्याघाती भवेत्कुष्ठी त्रयश्चांडालयोनिषु ॥ २ ॥
स्त्रीघाती गर्भपाती च पुलिंदो रोगवान् भवेत् ।
अगम्यागमनात् षंढो दुश्चर्मा गुरुतल्पगः ॥ ३ ॥ ”

( अर्थ–ब्राम्हणास मारणारा क्षयरोगी होतो. गाईला मारणारा कुबडा होतो. कन्याघाती कुष्ठी होतो, आणि चांडालयोनींत तीन वेळां जन्मास येतो. स्त्रियांस मारणारा, गर्भपातन करणारा रोगयुक्त भिल्ल होतो. अगम्य स्त्रीबरोबर गमन करणारा षंढ ( नपुंसक ) होतो. गुरुपत्नी बरोबर गमन करणारा दुश्चर्म म्हणजे हत्तीच्या कातडयाप्रमाणें त्याचें कातडें होतें. ) या भगवद्वाक्यावरून पूर्वजन्मार्जित पापपुण्यास दैव हें नांव आहे. व त्या दैवानेंच सुखदुःखाची प्राप्ति होते, असें सिद्ध झालें. हजारों रुपयांचा धर्म करणारास त्यापासून कांहींच लाभ नाहीं. व धर्म करूं नये असे अनेक अनर्थ जन्म, मरण, पाप, पुण्य न मानिल्यानें होतील. शास्त्रांस व्यर्थत्व येईल. आणि मनाप्रमाणेंच सर्व व्यवहार करूं लागलें म्हणजे कांहींच निर्णय होणार नाहीं. कोणाचें खरें आणि कोणाचें खोटें याची निवडानिवड तरी काय करावी. सर्वच विचार आहे.

दैवादिक कांहींच नाहीं असें म्हटल्यानें विशेष लाभ तरी काय आहे ? वादास आरंभ केला तर त्याची निर्विघ्नसमाप्ति होणार नाहीं. पुष्कळ ठिकाणीं निरुत्तर होऊन बसावें लागेल. विद्यारण्यांनीं पंचदशींत प्रारब्धाचे तीन प्रकार वर्णिले आहेत. ते, इच्छाप्रारब्ध, अनिच्छाप्रारब्ध आणि परेच्छाप्रारब्ध. भगवंतांनीं गीतेंतही सांगितलें आहे कीं,–

" सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥"

( अर्थ–विद्वानही आपल्या प्रकृतीप्रमाणें आचरण करितो. प्रकृति म्हणजे पूर्वजन्मीं केलेला धर्माधर्मादि संस्कार. त्या संस्काराला अनुसरून सर्व प्राणी वर्तन करितात. मीं अमुक करीन अथवा अमुक करणार नाहीं, असा निग्रह कोणाचाही चालत नाहीं.) असा निर्णय पुष्कळ ग्रंथकारांनीं केला आहे. याचा पूर्ण विचार न करितां कोणीं उद्योगालाच महत्त्व देत असतील तर देवोत. त्यांजला आमचें कांहीं म्हणणें नाहीं, परंतु, त्यांनीं थोडा विचार करून अहंकार टाकिला तर त्यांसही हाच पक्ष खरा आहे, असें म्हणावें लागेल. व कांहीं प्रसंगीं उद्योगवादी कुंठित होऊन दैवच खरें आहे, असें मानितात. परंतु, एकदां ज्याचा स्वीकार केला त्याचा त्याग करणें बरोबर नाहीं. "**अंगीकृतं सुकृतिनः परिपालयंति**" म्हणून दैव खरें आहे, असा जरी अंतःकरणाचा निश्चय झाला, तथापि तो प्रकट करीत नाहींत. उद्योगवाद्यास आणखी एक असा प्रश्न केला पाहिजे कीं, आपल्या उद्योगानेंच सर्व गोष्टी सिद्ध होतांत, असा आपला पूर्ण निश्चय आहे, तर सर्व कामें एकीकडे ठेवा. आणि सर्व प्राण्यांत चांगला असा जो मनुष्यदेह तो आपल्यास सहज मिळाला आहे. डोळे, कान, नाक, जिव्हा, त्वक् ( कातडें ) " **श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च** " हीं पांच ज्ञानेंद्रियें. वाणी, पाय, हात, गुद आणि शिश्न, " **वाक्पाणिपादपायूपस्थानि** " हीं पांच कर्मेंद्रियें. अशीं दहा इंद्रियें सर्व विषयोपभोगास साधनभूत आपल्यास चांगलीं समर्थ मिळालीं आहेत. ज्ञान

उत्कृष्ट आहे. या जगांत आपली कीर्तीही चांगली आहे. पूर्वजांनीं संपत्तिही पुष्कळ मिळवून ठेविली आहे. प्रस्तुत आपणही आपल्या बाहुबलानें मिळवित आहों. पत्नी, पुत्र, कन्या, नातू, पणतू, हत्ती, घोडे, पालखी इत्यादि या लोकांत जे जे पदार्थ उपभोगास असावे, ते सर्व आपल्यास अनुकूल आहेत. तरी आतां लवकरच सावध होऊन पुढें येणारा भयंकर मृत्यु सर्व पदार्थांचा वियोग करणारा, किंबहुना जन्मापासून जें शरीर मोठ्या प्रेमानें पुष्ट केलें, ज्या शरीराकरितां अनेक लोकांबरोबर कलह केले. अशा शरीराचा संबंध तोडणारा असा मृत्यु न येण्याविषयीं प्रखर उद्योग करावा. तो एकट्याला होण्यास योग्य नसेल तर दुसरे आपले संबंधि, मित्र इत्यादिकांस मदत घेऊन उद्योग केला पाहिजे, आणि मृत्यु चुकविला पाहिजे. म्हणजे आपल्या सर्व उद्योगाचें फल झालें. जर उद्योग करून ही गोष्ट सिद्ध झाली तरच उद्योग प्रधान आहे, असें म्हणतां येईल. नाहीं पेक्षां सहज कार्यें होणारीं आहेत तीं झालीं म्हणजे उद्योगानेंच झालीं, असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. या भाषणावर लोकांचे उद्गार सहज निघतील कीं, मरणें किंवा वांचणें हें कोणाच्या स्वाधीन नाहीं. व तें उद्योग केल्यानें बदलत नाहीं. जर उद्योग करून बदल होता तर पुष्कळ लोक वांचले असते. वैद्यांस कधींही मरण आलें नसतें. कारण, ते चांगले विद्वान् असून चांगला उद्योग करणारे असतात. त्यांजला सर्व गोष्टींचा अनुभव असतो. त्यांनीं यथायोग्य रसायणें घेऊन आपला प्राण वाचविला असता, आणि मोठे मोठे श्रीमान्, वैद्यांच्या उद्योगानें चिरंजीवी होते. तसा प्रकार झालेला अद्यापि कोठेंच दिसत नाहीं. मृत्यूचा पूर्ण अंमल बसलेला पाहून वैद्य स्पष्ट सांग-

तात कीं, ईश्वरइच्छेपुढें कांहीं उपाय नाहीं. आमचा प्रयत्न होता तो आम्हीं करून पाहिला. दैवयोग असेल तो खरा. हें वैद्यांचें म्हणणें सर्वांस जर मान्य आहे, तर उद्योगानेंच सर्व निर्वाह होत नाहीं, हें स्पष्ट झालें.

ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं तर प्रमाण नकोच. तें स्वानुभवसिद्धच आहे. ईश्वर आहे असा पक्ष स्वीकारिला म्हणजे जन्म, मरण, पाप, पुण्य हें सर्वच स्वीकारिलें पाहिजे. जर नशीब नाहीं, तर एकानें पालखींत बसावें, एकानें त्याच्या पुढें धांवावें, एकानें आंधळा होऊन अत्यंत दुःख भोगावें, एकानें सर्व इंद्रियांनीं सर्व विषयांचा उपभोग करावा, एकानें दोन दोन दिवस उपाशीं रहावें, एकानें अजीर्ण झालें म्हणून औषध घेत असावें, एकानें वर्षभर चाकरी करून शंभर रुपये मिळवावे, एकानें चार घटिकेंत दोनशें मिळवावे, एकानें सर्व द्रव्यादिकांची अनुकूलता असून निरंतर सारभातच परिमित जेवावा. एकास कांहींच संपत्ति घरदार नसतां रोज पक्वान्न भोजन करीत असावें, एकानें रात्रंदिवस उद्योग करून कष्ट भोगावे, दुसऱ्यानें प्रातःकालापासून एक एक विषयाचें सेवन करावें, या सर्व सम विषम स्थिति, नशीब खरें आहे; असा पक्ष स्वीकारिल्याशिवाय सिद्ध होत नाहींत. केवल उद्योग मानून बसणें म्हणजे लहान मूल जसें समजूत नसल्यामुळें कांहीं एक हट्ट घेऊन बसतें, त्या प्रमाणेंच हा अविचाराचा पक्ष आहे. सूक्ष्म विचार करून पहा. व्यास, शुकाचार्य साक्षात् श्रीकृष्ण भगवान् यांजला खोटें सांगण्यापासून कांहीं लाभ नव्हता, व लाभ असता तरी अशा जगन्नियंत्यांस असत्य बोलण्याची इच्छा कधींही झाली नसती. ते जर दैव खरें, सर्व दैवाधीन आहे असें

सांगतात, व दैवाप्रमाणें वर्तन करितात. तर त्यांच्या मताचा त्याग करून अनेक कल्पना करून उद्योगच थोर आहे, असें सांगणाऱ्या आधुनिक विद्वानांवरच विश्वास ठेवणें प्रशस्त नाहीं. कोठें कोठें उद्योगाचीही प्रशंसा केलेली दिसते. एका कवीनें म्हटलें आहे कीं,–

"उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी- ।
दैवं प्रधानमिति कापुरुषा वदंति ॥
दैवं विहाय कुरु पौरुषमात्मशक्त्या ।
यत्ने कृते यदि न सिध्यति कोत्र दोषः" ॥

( अर्थ–उद्योग करणाऱ्या श्रेष्ठ पुरुषास लक्ष्मी प्राप्त होते. नशीब थोर आहे असें आळशी पुरुष म्हणतात. तरी दैव एकीकडे ठेवून आपल्या शक्तीप्रमाणें उद्योग करावा. यत्न करून जर इष्ट-कार्यसिद्धि झाली नाहीं, तर तो दोष मनुष्यावर रहात नाहीं. ) इ-त्यादि. तेंच प्रकरण पाहूं लागलें म्हणजे उद्योगाविषयीं पुष्कळ वा-क्यें सांपडतील. परंतु त्यांजवर विश्वास ठेवून उद्योग करूनच खा-त्रीनें मनासारख्या सर्व गोष्टी सिद्ध होतील, असें म्हणतां येणार नाहीं. कोणत्याही कार्याचें पर्यवसान दैवावरच ठेविलें पाहिजे. खरोखर पाहिलें तर कोणत्याही कार्याची सिद्धि किंवा असिद्धि दैवानेंच होते. परंतु सिद्धि झाली म्हणजे आपल्या अहंपणानें मनुष्य म्हणतो कीं, हें काम मीं उद्योग केला म्हणूनच झालें. सिद्धि झाली नाहीं म्हणजे म्हणतो कीं, काय करावें सर्व गोष्टी दैवाधीन आहेत. माझा उद्योग करणें होता तो मीं केला. असे परिणामीं भाषणाचे दोन प्रकार होतात ते न व्हावे. कोणत्याही उद्योगास आरंभ केला असतां अहंकारानें

आपण सिद्धांत करूं नये. " उद्योग करीत आहों, परंतु फलप्राप्ती दैवाधीन आहे" असा पहिल्यापासून दृढ निश्चय ठेविला म्हणजे भाषणांत बदल करावा लागत नाहीं. पुराणांत तर असें दृष्टीस पडतें कीं, भक्त आपल्या घोर तपश्चर्येनें भगवंतास प्रसन्न करितो, भगवान पुढें येऊन वर माग म्हणून सांगतात. त्या प्रसंगांत भक्तानें मला पुत्र असावा असें जर मागितलें, तर भगवान विचार करून सांगतात कीं, बाबा, तुझ्या प्रारब्धीं पुत्रसुख नाहीं. त्या शिवाय दुसरें कांहीं मागणें असेल तर मागावें. असें भगवंताचें भाषण ऐकिल्यावर मग तपश्चर्या करणाऱ्या भक्ताच्या अंतःकरणांत अशी भावना होते कीं, दैवाच्या अनुकूलतेशिवाय प्रयत्न करून देवाचेंही कांहीं चालत नाहीं. म्हणून दैवासच देव म्हटलें पाहिजे. असा विचार करून तो भक्त अत्यंत खिन्न होऊन आपल्या उद्योगास लागतो. अशा तऱ्हेच्या पुराणांत पुष्कळ गोष्टी आहेत.

असो, वाचकांस असें वाटेल कीं, संगति आणि उद्योग यांचा संबंध नशीबाशीं किती असतो, हा विषय प्रतिपादन करितां करितां पुनः सर्व दैवाचेंच कथन केलें. तो विषय तसाच राहिला, असें समजूं नये. कारण संगति आणि उद्योग यांचा संबंध नशीबाशीं आहे. परंतु उद्योग किंवा संगति यांस स्वतंत्रपणा नाहीं. तीं दैवाधीन आहेत. असा दृढ निश्चय करण्या करितां पुनः दैवाचें कथन केलें. आतां संगतीविषयीं थोडा विचार केला पाहिजे. चांगल्या संगतीचा चांगला आणि वाईट संगतीचा वाईट परिणाम होतो. असा लोकांचा दृढ निश्चय झाला आहे, व तो कांहीं अंशीं खरा आहे, असें म्हटलेंच पाहिजे. पहा, रावण, कुंभकर्ण आणि बिभीषण हे सोदर. यांच्या सर्व स्थितीचें वर्णन

वाल्मीकिरामायणांत विस्तृत आहे. व तें सर्व लोकांस माहित आहे. विशेष सांगणें नको. कुंभकर्णाचा स्वभाव लहानपणापासून दुष्ट असून सर्वांस त्रास देणारा होता. रावणही तसाच दुष्ट होता. बिभीषणाचें दुष्टपणाविषयीं वर्णन नाहीं. कांहीं कालानंतर तिघांनींही घोर तपश्चर्या करून ब्रम्हदेवास प्रसन्न करून घेतलें. ब्रम्हदेव सुप्रसन्न होऊन रावणाजवळ आला, तेव्हां रावणानें वरप्रदान मागून घेतलें कीं, मला देव, गंधर्व, किन्नर, यक्ष इत्यादिकांपासून मृत्यु नसावा. त्या प्रमाणें वर देऊन ब्रम्हदेव कुंभकर्णाकडे आले असतां सर्व देव भयभीत होऊन सरस्वतीची प्रार्थना करून त्याच्या भाषणांत विपर्यास उत्पन्न केला. त्यामुळें कुंभकर्णानें निद्रा मागून घेतली. नंतर ब्रम्हदेव बिभीषणाकडे आले, तेव्हां बिभीषणानें मला निरंतर विष्णुभक्ति असावी, असें मागून घेतलें. या प्रमाणें तिघांसही वरप्रदानें मिळाल्यानंतर रावणानें आपल्या प्रतापानें जगतास पुष्कळ त्रास दिला. अरण्यांत तपश्चर्या करणाऱ्या थोर थोर ऋषींस तपापासून भ्रष्ट केलें. सर्व देवांचे अधिकार आपण घेतले. आणि रावण परम उन्मत्त झाला, तेव्हां सर्व देवांनीं विष्णूची प्रार्थना केल्यावर भगवंतांनीं भक्तांच्या रक्षणार्थ अयोध्यानगरांत जन्म धारण केला. राजा दशरथाचें वचन सत्य करण्या करितां भ्राता लक्ष्मण आणि जानकी यांच्यासह वर्तमान रामचंद्र वनवास करण्या करितां निघून अरण्यांतील अनेक दुष्टांचें नाशन केलें. पुढें रावणानें जानकीस चोरून नेल्यावर जानकीचा शोध करण्या करितां रामचंद्र पुढें जात असतां सुग्रीवाची भेट झाली. आणि परस्पराचें मित्रत्व होऊन रामचंद्रानें वालीचा वध करून सुग्रीवास किष्किंधेचें राज्य दिलें. वाचक हो! हा रामायणाचा

कथाभाग नित्य वाचण्यांत ऐकण्यांत आहे, असें म्हणून इकडे दुर्लक्ष्य करूं नका. हा भाग दृष्टांताकरितां येथें घेतला आहे. आतां असा विचार करा कीं, सुग्रीवानें रामाचें मित्रत्व होण्याचा काय उद्योग केला ? व उद्योग करूनही अशा थोर पुरुषांची संगति वानरास मिळाली असती काय ? सुग्रीवास तशी कोणत्याही प्रकारची संगति नसून हा योग घडला. व रामचंद्रास अरण्यवासी लोकांची संगति नसून अरण्यवास करावा लागला. असो, दोघांचें सख्य झाल्यावर जानकीचा शोध करून रावणाच्या वधाकरितां भगवान् रामचंद्र समुद्रतीरावर प्राप्त झाले. इकडे रावणास बिभीषणानें कांहीं सदुपदेश केल्यावरून रावण अत्यंत क्रोधायमान होऊन बिभीषणाचा तिरस्कार केला. तेव्हां बिभीषण आपल्या चार प्रधानांस बरोबर घेऊन रामचंद्राकडे प्राप्त झाला, आणि रामचंद्रास सर्व वर्तमान सांगून अनन्यभावानें त्याच्या चरणांवर प्रीति ठेविली. रामचंद्रानें त्याचा प्रेमभाव जाणून त्याजला तेथेंच समुद्राच्या उदकानें लंकेच्या राज्याचा अभिषेक केला. हा कथाभाग सर्वांस माहित आहेच. यांत असा विचार केला पाहिजे कीं, जन्मापासून दुष्ट संगति दुष्टकुलांत जन्म असूनही ज्याच्या स्वभावांत फेरबदल झाला नाहीं. आपल्या कुलाकडे लक्ष न देतां जो भगवंतास शरण आला, त्या बिभीषणाचें संगतीनें काय केलें ? जो खरा विचार करून न्यायानें वागणारा आहे, त्याजला संगतीचा कांहीं संबंध नाहीं. संगतीनें चांगला किंवा वाईट गुण लागला, व आपल्या स्थितींत संगतीनें फेरबदल झाला असें म्हणणें हें केवळ अज्ञान आहे, असें विचारशील म्हणतील.

आतां ही गोष्ट सर्वांस मान्य होण्याजोगी नाहीं. पुष्कळ लोकांची

समजूत अशी आहे कीं, संगतीनें पाहिजे तें होतें. परंतु हा सिद्धांत शेवटास पोंचणारा नाहीं. कारण वाईट संगतीचा परिणाम चांगला, आणि चांगल्या संगतीचा परिणाम वाईट; असा प्रकार दृष्टीस पडतो. असें जरी आहे, तथापि संगती करते वेळीं चांगली करावी. चांगल्या संगतीचा परिणाम जरी वाईट झाला तरी, संगती वाईट होती म्हणून अशा स्थितीस आला; असा जो लोकापवाद आहे तो तर नाहींसा होतोच. आणि आपल्या मनासही विशेष दुःख होत नाहीं. हा एक मोठा लाभच मानिला पाहिजे. संगति कशीही असली, तथापि कोणत्याही कार्याचा परिणाम दैवाधीन असतो. कावळा आणि कोकिळ लहानपणांत एके ठिकाणीं असतात. तेव्हां कोकिळाच्या सत्संगतीनें कावळ्यास काय लाभ होतो? आणि कावळ्याच्या दुष्टसंगतीनें कोकिळाची कोणती हानि होते ? चांगल्या संगतीपासून कांहीं तरी हित होतें, हें लोकदृष्ट्या खरें मानिलें पाहिजे. परंतु, संगतीनें मूळ सिद्धांतांत फेरफार होत नाहीं. एका कवीनें चांगल्या संगतीचा महिमा लिहिला आहे कीं,–

" करोति निर्मलाधारस्तुच्छस्यापि महर्घताम् ।
अंबुनो बिंदुरल्पोपि शुक्तौ मुक्ताफलं भवेत् ॥ "

(अर्थ–निर्मल आश्रयानें साधारण वस्तूला पुष्कळ किंमत येते स्वातीच्या उदकाचा अल्प बिंदु शुक्तींत ( शिंपींत ) पडला म्हणजे त्याचें मोती होऊन पुष्कळ किंमत येते. ) या दृष्टांताचा ज्ञात्यांनीं सूक्ष्म रीतीनें विचार केला पाहिजे. शुक्तींत पडलेल्या पाण्याच्या थेंबाचें रूपांतर झालें, म्हणून त्याजला विशेष योग्यता आली. या प्रमाणें संगतीनें

ज्याचें रूपांतर होईल, त्याला तसें म्हणतां येईल. उगीच वरवर संगती केल्यानें त्या संगतीपासून कांहीं लाभ नाहीं. ज्याची संगति धरावी, त्या सारखें आपण व्हावें. तें होणें आपल्या स्वाधीन नाहीं. उत्तमास उत्तमाची संगति मिळाली तर त्या पासून लाभ होतो. सोनें आणि रत्न यांची संगति झाली म्हणजे परस्परांस परस्परांच्या आश्रयानें विशेष योग्यता येते. लोखंडानें हिऱ्याची संगति केली तर त्याला काय लाभ होणार आहे? तर मूळ सोनें असून रत्नाची संगति केली तर योग्यता वाढते. लोखंड आणि परीस यांचा संबंध झाला असतां लोखंडाचें सोनें होतें, अशी लोकप्रसिद्धि आहे. व थोर थोर शंकराचार्यांसारखे ज्ञातेही तो दृष्टांत ठिकठिकाणीं देतात. आचार्यांनीं आपल्या शतश्लोकींत म्हटलें आहे कीं,–

" दृष्टांतो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातुः।
स्पर्शश्चेत्तत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम् ॥
न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्गुरुः स्वीयशिष्ये ।
स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वा लौकिकोपि ॥"

( तात्पर्य–ज्ञानदाता जो सद्गुरु त्याला या त्रिभुवनांत दृष्टांत नाहीं. परीसाचा दृष्टांत द्यावा तर तो बरोबर नाहीं. कारण परीस लोखंडाचें सोनें करितो. त्यांत परीसपणा आणीत नाहीं. म्हणजे लोखडाचें सोनें करण्याचें सामर्थ्य येत नाहीं. सद्गुरु आपल्या शिष्याला आपल्या सारखा करितात, म्हणून ते निरुपम आहेत. ) वरील चाललेल्या विषयांत तात्पर्यार्थ इतकाच कीं, संगतीनें मूळ स्थितींत म्हणजे नशीबांत फेर होत नाहीं. संगतीनें मोठेपणा येतो, अशा विषयीं जे दृष्टांत आहेत,

ते सर्व स्वभावसिद्ध आहेत. म्हणजे स्वातीच्या उदकानें मोतीं उत्पन्न होणें हें ईश्वरइच्छेनेंच ठरलें आहे. तें संगतीनें होतें, असें म्हणतां येत नाहीं. सोन्याचे आणि पितळेचे मणि एका ठिकाणीं पुष्कळ दिवस ठेविले म्हणून सोनाराकडे नेल्यावर पितळेच्या मण्यांची किंमत सोन्याच्या मण्याप्रमाणें सोनार देईल काय ? **"काचः काचो मणिर्मणिः"** यांत कांहीं अंतर पडत नाहीं.

चांगल्या संगतीनेंच चांगला लाभ झाला असें जें वाटतें तें एक प्रकारचें अज्ञान आहे. राजा आणि त्याचे नित्य जवळ असणारे सेवक यांची सतत संगति असते. परंतु त्यांस दरमहां बारा किंवा पंधरा जे दैवानें मिळत असतील, त्यांत फेरबदल राजाचा बापही करण्यास समर्थ झाला नाहीं. मग राजा कोठून करील. त्याच्या प्रारब्धापुढें राजाचा कांहीं उपाय नाहीं. चांगल्या थोर श्रीमंताच्या संगतीनें त्याचा आश्रित मनुष्य यजमानाबरोबर कांहीं लग्न वगैरे समारंभ असला म्हणजे तेथें जातो. पुढें आंत गेल्यावर तेथील व्यवस्थापक यजमानास नेऊन योग्यस्थलीं बसवितात. आणि बरोबर गेलेला आश्रित प्रारब्धानें दोन तीन दरवाजांतून कदाचित् सुटून जर आंत गेला, तर कोठें तरी जागा मिळेल, तेथें एका कोपऱ्यांत मुकाट्यानें बसून राहतो. यजमान साहेब त्या मृदु गादीवर बसून स्वस्थपणानें नृत्यगायनाचा आनंदानुभव घेऊन अत्तर, गुलाब, जाहल्यावर दोन दरवाजांतून बाहेर आल्यावर मग आपल्या आश्रिताचा शोध करितात, आणि परस्पर मिळून घरीं जातात. येथें चांगल्या संगतीचा किती उपयोग झाला, याचा विचार करा. पुण्यासारख्या शहरांत तर थोर लोकांच्या संगतीनें निरंतर राहणारांच्या लाभाचा विचार करून पाहिलें तर प्रत्येक दिवशीं भोजनास

बसले म्हणजे तो विषमभाव पाहून त्यांच्या अंतःकरणांत किती दुःख होतें तें सांगतां येत नाहीं. आरंभींच यजमानाचा चांदीच्या फुल्यांचा पाट, त्याजवर मोठें चांदीचें ताट, त्यांत आंबेमोहराचा भात, आंधळें वरण, चांदीच्या वाटींत साजूक घट्ट तूप, पुष्कळ फोडणीच्या भाजा, बक्षी गव्हांची खरपूस पोळी, दुधांतील बेसन, मागून कालवणास मधुर दहीं, इत्यादि हें खाशांचें भोजन. आतां आश्रितांचा बेत पहा. राशीतांदुळांचा दिव्य भात, डोळस वरण, पुष्कळ बाजरीची मृदु भाकरी, तुपाचा तर मोठाच चमत्कार! वसिष्ठपत्नीप्रमाणें तुपाचें भांडें, विद्युल्लतेप्रमाणें त्यांत एक दिव्य पळी, तुपाची धार योगबलाशिवाय दृष्टीस पडणें कठीण, मोठ्या त्वरेनें गमन करणारी एक भाजी आणि शुद्ध गंगोदकासारखें ताक इत्यादि आश्रितांच्या भोजनाचा प्रकार. असा चमत्कार दृष्टीस पडला म्हणजे अंतःकरणास खरोखर कांहीं तरी खेद वाटल्याशिवाय राहिल काय? श्रीमंताजवळ असणारे लोक सर्वच निरुद्योगी असतात असें नाहीं. प्रत्येक मनुष्य आपल्या उद्योगांत असतो. आपल्या शक्तीप्रमाणें कामधंदा करितो. सर्वांस चांगल्या पदार्थांची इच्छा सारखी आहे. श्रीखंडाची रुचि श्रीमंतासच फार चांगली आणि गरीबास वाईट असें कधीं तरी होईल काय? जो विचार करणारा आहे, तो आपल्या मनाची समजूत अशी करितो कीं, " **नादत्तमुपतिष्ठते** " ( दिल्याशिवाय मिळत नाहीं. ) हा एक न्याय आहे. याचा विचार करून ते असें म्हणतात कीं, आम्हीं पूर्वजन्मीं जशीं कर्में केलीं आहेत, तसा आम्हांस उपभोग होत आहे. त्या विषयीं आतां विचार करून काय उपयोग आहे. प्रस्तुत कितीही उद्योग केला तथापि ठरलेल्या स्थि-

तींत कांहीं बदल होत नाहीं. याचा अनुभव निरंतर येतच आहे. असें मानून ते स्वस्थ राहतात. उद्योगानें सर्व सिद्ध होतें, असा निश्चय करून उद्योगास आरंभ केला म्हणजे विषमभाव पुढें येऊन उभा राहतो. विद्या चांगली झाली म्हणजे द्रव्य मिळतें. तेव्हां विद्या करणें हा उद्योग आहे. तो सर्वांचा सारखा कां नसावा? म्हणजे श्रीमंताच्या घरीं येऊन गुरुजी त्याला मोठ्या प्रेमानें शिकवितात. चांगल्या चांगल्या पुस्तकांचे सहाय त्याजला मिळतें. भोजनादिकांची कांहींच चिंता करावी लागत नाहीं. गरीबाला शाळेंतील महिन्याचें जें ठरलेलें द्रव्य असेल तेंही देण्यास मिळत नाहीं. पुस्तकांच्या मोठमोठ्या किंमती असल्यामुळें पाहिजे तीं पुस्तकें मिळणें कठीण. भोजनाची तर रात्रंदिवस चिंता मागें लागलीच आहे. भुकेसारखें प्रखर दुसरें दुःख कांहीं नाहीं. एका कवीनें म्हटलें आहे कीं,–

" मातृदुःखं च षण्मासं पितृदुःखं च वत्सरम् ।
भार्यादुःखं पुनर्भार्या क्षुधादुःखं दिने दिने ॥ "

( अर्थ–मातोश्री मृत झाल्याचें दुःख सहा महिनें, बापाचें वर्षभर, बायकोचें दुःख पुनः लग्न होई पर्यंत, अशीं हीं दुःखें आहेत. भुकेचें दुःख प्रत्येक दिवशीं दोन वेळां आहे. ) त्यामुळें गरीब त्रासून जातात. शाळेंत मोठमोठाले संभावीत लक्ष्मीपुत्र असतात. परंतु आपल्यास त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. आपल्या नशीबाप्रमाणें आपल्यास जें मिळणें असेल तें मिळतें. यांत कांहीं संशय नाहीं. उद्योग करणें व चांगली संगाति हीं दोन्हीं कृत्यें चांगलींच आहेत. उद्योग करणारास लोकांपासून त्रास होत नाहीं. उद्योग करून त्यापासून लाभ

झाला नाहीं तरी पुरुषाकडे त्याचा दोष रहात नाहीं. चांगली संगति असली म्हणजे ती पासून केवळ नुकसान होणार नाहीं, परंतु लाभ होणें हें दैवाधीनच आहे.

आतां कोणीं असें म्हणेल कीं, उद्योगानें कांहीं होत नाहीं, व संगतीनें कांहीं लाभ नाहीं, तर उद्योग व संगति सोडून स्वस्थ बसावें. मग काय होणें असेल तें होईल. या शंकेचें उत्तर मागें सांगितलें आहे कीं,–

" नहि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥"

( अर्थ–कोणींही प्राणी एक क्षणभर सुद्धां स्वस्थ बसत नाहीं. तो आपल्या नशीबाच्या प्रेरणेनेंच सर्व उद्योग करितो, ) तेव्हां स्वस्थ बसणें किंवा मोठ्या मेहनतीचीं कामें करणें याचा अधिकार पुरुषाकडे आहे, असें दैववादी मानीत नाहीं. कारण बुद्धि कर्माप्रमाणें होते, हा दैववाद्यांचा सिद्धांत आहे. हा सिद्धांत मनांत आणिला म्हणजे संगति आणि उद्योग हे निराळे आहेत, असें म्हणतां येत नाहीं. कारण चांगली संगति मिळणें हें दैवाशिवाय होत नाहीं, व उद्योग करण्याची वासना होऊन त्या उद्योगानें आपल्यास लाभ होणें हेंही दैवाधीन आहे. असा दैववाद्यांचा पक्ष मानिल्यावर उद्योग आणि संगति यांचा संबंध नशीबाशीं निरंतर आहेच; असें सिद्ध झालें. परंतु उद्योगवाद्यांनीं संगति आणि उद्योग यांचा कर्तेपणा आपल्याकडे मानिला आहे. आणि प्रारब्धवाद्यांनीं तो संबंध दैवाकडे ठेविला आहे. इतकाच दोघांचें मतांत फेर आहे. फलप्राप्तीविषयीं दोघांचा सारखेपणाच आहे.

लहान मूल उत्पन्न होतें त्यावेळीं त्याचा कांहींच उद्योग नसतो. परंतु एका जीवास अनेक उपभोग घडतात. अनेक सेवक सेवा करण्याविषयीं तत्पर होतात. ज्याच्या जन्मकाळीं अनेक ब्राह्मणांस पुष्कळ द्रव्य मिळतें, मोठा आनंद चालू होतो, ठिकठिकाणीं अनुष्ठानें सुरू होतात, बंदिवान परम कष्टांतून मुक्त होतात, अशा आनंदानें तो थोर झाल्यावर कांहीं उद्योग संगतीशिवाय त्याला राज्याभिषेक होऊन राजा होतो. आणि सर्व विषयांचा उपभोग यथेच्छ घेतो. दुसरा कोणीं एक जीव हतदैव ब्राह्मणाचे घरीं जन्मास येतो. तेथें जन्म झाल्यापासून त्या बालकाच्या दुःखासच आरंभ होतो. म्हणजे मातोश्रीस कांहीं ज्वरादि पीडा होऊं लागते, त्यामुळें ती आपल्याच दुःखांत निमग्न असल्यामुळें बालकाकडे थोडें दुर्लक्ष होतें. आणि अज्ञानी जीवास नानाप्रकारचीं दुःखें होतात. त्याला तीं तोंडानें सांगतां येत नाहींत. अशा प्रकारानें परम कष्ट भोगून थोर झाल्यावर अन्नवस्त्राचीही चिंता करावी लागते. अशा प्रसंगीं त्याला आश्रय देणारा दैवाशिवाय दुसरा कोणीं नाहीं.

वाचकहो ! श्रीमंताचे घरीं जन्मास येणें, आणि गरीबाचे घरीं उत्पन्न होणें हें कशानें होतें याचें उत्तर काय ? असा जर उद्योगवाद्यास प्रश्न केला तर तो काय उत्तर देईल ? याचें उत्तर खरोखर दैवाचा स्वीकार केल्याशिवाय कांहीं देतां येणार नाहीं. कारण पाप पुण्य आणि जीव यांचा संबंध फार पुरातन आहे. त्या पापपुण्याच्या तरतमभावानेंच सुखदुःखाच्या प्राप्तीची कल्पना शास्त्रानें केली आहे. पुण्य आणि पाप हें सुखदुःखाचें बीज आहे. जुनाट अनेक जन्मार्जित जें पाप पुण्य त्याचेंच नांव दैव नशीब असें आहे.

आतां उत्पन्न होणारा जीव ( मनुष्य ) आदि, किंवा पापपुण्यात्मक कर्म आदि, असा जर कोणीं प्रश्न केला तर याचें उत्तर निर्विवाद सांगतां येत नाहीं. बीज आदि किंवा वृक्ष आदि ? बीज आदि असें जर म्हणावें तर तें बीज कोणापासून झालें याचें उत्तर पाहिजे. वृक्ष आदि असें म्हणावें तर तो बीजावांचून कसा झाला ? या शंकेचें समाधान झालें पाहिजे. बीजापासून वृक्ष, पुढें वृक्षापासून बीज; अशी परंपरा घेऊन चाललें म्हणजे पुढील न्याय सरळच आहे. परंतु आरंभी याची योजना काय करावी ? जसा वृक्षबीजन्याय तसाच मनुष्य आदि, किंवा नशीब आदि; नशीब जर आदि म्हणावें तर त्याचा कर्ता कोण ? उत्पन्न होणाऱ्या मनुष्याचें कर्म पूर्वींच कोणीं करून ठेविलें अशी शंका. मनुष्य उत्पन्न झाल्यावर मग त्यानें कर्म केलें असें जर म्हणावें, तर तो मनुष्य अमुक योग्यतेचा ( चांगला शहाणा सर्वेंद्रियांनीं युक्त, किंवा मूर्ख, आंधळा, लंगडा इत्यादि ) व्हावा अशाविषयीं त्याचा नियामक कोण ? नशीब आणि मनुष्य या दोन पदार्थांत प्राथम्य ( पहिलेपणा ) कोणाला ? याचा विचार जर करूं लागलें तर तें कांहींच ठरावें तसें न्यायानें ठरणार नाहीं. कारण श्रीमद्भागवताच्या तृतीयस्कंधांत विदुर आणि मैत्रेय यांच्या संवादांत मैत्रेयांनीं सांगितलें आहे कीं,-

" सेयं भगवतो माया यन्नयेन विरुद्ध्यते ।
ईश्वरस्य विमुक्तस्य कार्पण्यमुत बंधनम् ॥ "

( अर्थ-भगवान् अचिंत्यशक्ति जो ईश्वर त्याची ही माया आहे कीं, ज्या वस्तूविषयीं तर्क करूं लागलें असतां विरोध येतो. सरळ

निर्णय होत नाहीं. विमुक्त जो ईश्वर त्याला अज्ञानानें बंधन आणि कृपणपणा प्राप्त होतो. ) जो विमुक्त त्याला बंधन कसें? व जो बद्ध तो विमुक्त कसा ? बद्धपणा व मुक्तपणा हे दोन्हीं धर्म एके ठिकाणीं असणें हें न्यायानें विरुद्ध आहे. जसें प्रकाश आणि अंधकार हे एका ठिकाणीं असण्याचा संभव नाहीं तसें. म्हणून याचें नांव माया; या मायेचें लक्षण श्रीधरस्वामीनीं एका प्रसंगात लिहिलें आहे कीं,– " **सत्वासत्वाभ्यामनिर्वाच्या** " ( म्हणजे माया आहे असेंही म्हणतां येत नाहीं, व नाहीं म्हणतां येत नाहीं. ) अशा तऱ्हेची माया आहे. या मायेची कल्पना केली म्हणजे सर्व शंका दूर होतात. स्वप्नांत ज्या विषयाचा आपण उपभोग करितों तो विषय त्यावेळीं खोटा आहे असें कधींही वाटत नाहीं, व तेथें खोटया खऱ्याची कल्पनाही नाहीं. पुढें जागें झाल्यावर पहावें तर तो विषय आपल्याजवळ कांहींच नाहीं. आपल्यास त्या सर्वविषयाचें स्मरण असतें, परंतु तें खोटें असें मानून त्याचा त्याग करितों. तसाच हा मायेचा प्रकार आहे. वाचकांस असें वाटेल कीं, नशीब आणि उद्योग या साधारण विषयांत माया, ईश्वर, जीव, दैव, या मोठमोठाल्या खटपटी कशाला ? उद्योग थोर किंवा दैव थोर याचें एक उत्तर सांगण्याचें एकीकडे ठेऊन, ह्या अदृष्टगोष्टी म्हणजे प्रत्यक्ष न दिसणाऱ्या यांचा येथें विचार कशाला? अशी शंका येईल त्याचें उत्तर असें कीं, कोणीं कांहीं प्रश्न केला असतां त्याचें उत्तर कांहीं तरी लोकांस बरें वाटेल, साधारण पुष्कळ लोकांस मान्य होईल, असें देणें हें बरोबर नाहीं. कारण शास्त्ररीत्या खरा न्याय झाला पाहिजे. क्षणभर आनंद होण्याजोगें भाषण करणें यांत काय अर्थ आहे ! कोणीं एक परम श्रीमान् अत्यंत पीडेनें व्याप्त

होऊन आसन्नमरण झालेला असतो, आणि त्याच्याजवळ असणारे त्याचे सर्व संबंधी पुत्रादिक परमशोकानें व्याकुल होऊन वैद्यास विचारितात कीं, वैद्यबुवा, आतां व्यवस्था कशी काय होणार ? असें विचारिलें म्हणजे वैद्य चांगला विचारी असल्यामुळें उत्तर देतो कीं, अहो, कांहीं चिंता करूं नका. यापेक्षां जास्त प्रकृति बिघडलेले हजारों रोगी माझ्या हातानें बरे झाले आहेत. त्यांतून यांची अवस्था अद्यापि चांगली आहे. विशेष काळजी करण्याचें कारण नाहीं. तुम्हीं स्वस्थ रहा. माझा उपाय आहे तितका मीं करितों.

" व्याधेस्तत्वपरिज्ञानं वेदनायाश्च निग्रहः ।
एतद्वैद्यस्य वैद्यत्वं न वैद्यः प्रभुरायुषः ॥ "

( अर्थ—व्याधीचें खरें ज्ञान होऊन दुःखाचा प्रतिबंध करणें हाच वैद्याचा वैद्यपणा आहे. वैद्य आयुष्य देण्यास समर्थ नाहीं. )आतांच समीरपन्नगाची मात्रा दिली आहे. ती पोटांत गेल्यावर आपलें कार्य केल्यावांचून रहाणार नाहीं. असें त्या पुत्रादिकांच्या आनंदार्थ मनाप्रमाणें वैद्य भाषण करितो, परंतु तें त्याचें भाषण सत्य नव्हे. थोड्याच वेळांत त्याचा अनुभव प्रत्यक्ष येतो. त्याप्रमाणेंच जे कोणीं विचार केल्याशिवाय उद्योगच खरा आहे, असा वाद करणारे आहेत; त्यांच्या अंतःकरणास क्षणभर आनंद होण्याकरितां पाहिजे तर तसें अनुकूल भाषण करावें. परंतु तें परिणामीं कांहीं उपयोगीं पडणारें नाहीं. तें आभासमात्र आहे. त्यांत सत्यत्व नाहीं. ज्या कार्यसिद्धि प्रारब्धाच्या प्रेरणेनें उद्योग होऊन सफल होतात, त्या उद्योगवादी उद्योगानेंच झाल्या असें मानितात. दैववादी दैवानें झाल्या म्हणतात.

इतकेंच परस्परांत अंतर आहे. दोघांचा व्यवहार सारखाच. नशीबानेंच सिद्ध होणाऱ्या कार्यावर उद्योगानेंच झालें अशी कल्पना करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. संगति आणि उद्योग यांचा नशीबाशीं संबंध आहे, परंतु नशीबानें सिद्ध असलेल्या कामांत यांचें कांहीं चालत नाहीं. याविषयीं एवढा ठळक दृष्टांत मनांत आणिला पाहिजे, ज्याचें नांव ऐकिल्या बरोबर आबालवृद्ध मान डोलवितात. ज्याच्या मार्गाला अनुसरून चालणारे भवसमुद्रांतून तरून जातात. दैत्यकुलांत ज्याचें जन्म, ज्याचा बाप हिरण्यकशिपु, घोर तपश्चर्या करण्याकरितां मंदरपर्वतावर गेला असतां जो मातोश्रीच्या उदरांत होता, अशी संधि पाहून सर्व देव दैत्यांबरोबर युद्ध करण्या करितां आले, त्यावेळीं सर्वांनीं प्राण रक्षणार्थ पलायन केलें. नंतर इंद्र कयाधूस घेऊन जात असतां मार्गांत नारदाची गांठ पडली. तेव्हां नारदांनीं सांगितलें कीं, इंद्रा, कयाधूला घेऊन जाऊं नको. हें ऐकून इंद्रानें सांगितलें कीं, ही प्रसूत झाल्यावर पुत्राचा नाश करून सोडून देईन. असें ऐकून नारद म्हणाले हिच्या उदरांत परमभागवतशिरोमणि आहे. त्याचा नाश होणार नाहीं. असें नारदाचें भाषण ऐकतांच इंद्रानें तिला सोडून दिली, आणि स्वर्गास गेला. मग नारदांनीं कयाधूस आपल्या आश्रमांत नेऊन तिचें समाधान करून तेथें ठेविली. कयाधूही आपला पति परत येईपर्यंत ऋषीची सेवा करून स्वस्थ राहिली. नारदानें तिला धर्मतत्व व ज्ञान दोन्हीं सांगितलीं.

इकडे हिरण्यकशिपूच्या घोर तपश्चर्येनें ब्रह्मदेव प्रसन्न होऊन वरप्रदान मिळाल्यावर हिरण्यकशिपू आपल्या घरीं आल्यावर कयाधू प्रसूत होऊन भक्तशिरोमुकुट प्र्हाद झाला. तो थोर झाल्यावर आपल्या

कुलगुरूकडे विद्याभ्यासाकरितां पाठविला. प्र्हादानें गुरूंनीं सांगितलेलें ऐकिलें व तसें पठनही केलें, परंतु तें त्यास प्रिय वाटलें नाहीं. एके दिवशीं हिरण्यकशिपूनें पुत्रास मोठ्या प्रेमानें मांडीवर घेऊन विचारिलें कीं, प्र्हादा, तुला चांगलें काय वाटतें ? प्र्हाद म्हणाला अरण्यांत जाऊन भगवान् विष्णूचें सेवन करावें. यापेक्षां या जगांत दुसरें कांहीं चांगलें नाहीं. हें प्र्हादाचें भाषण ऐकून हिरण्यकशिपूला अत्यंत क्रोध येऊन म्हणाला कीं, हा मूर्ख माझ्या शत्रूचें भजन करितो याचा नाश केला पाहिजे. असा विचार करून दूतांस आज्ञा केली. अरे ! पाहतां काय ? या दुष्टाचा लवकर नाश करा. अशी आज्ञा होतांच त्या दुष्टांनीं नानाप्रकारच्या शस्त्रांनीं प्र्हादास प्रहार करण्याचा आरंभ केला. मोठमोठे हत्ती अंगावर सोडिले, पर्वतावरून खालीं लोटून दिला, अग्नींत टाकिला, असे अनेक प्रकार केले. परंतु त्या भयंकर कर्मापासून त्या भगवद्भक्तशिरोमणीला कांहींच त्रास झाला नाहीं. शेवटीं भगवान् भक्तवत्सल स्तंभांतून प्रकट होऊन, आपल्या प्रियभक्ताचा छल करणारा जो हिरण्यकशिपु त्याचें उरस्थल आपल्या प्रखर नखांनीं विदारण करून त्याचा प्राण घेतला. या दृष्टांताचा तात्पर्यार्थ इतकाच कीं, प्र्हादाला लहानपणापासून दुष्टसंगति व दुष्टकुलांत जन्म असूनही दैवानें सिद्ध असलेल्या स्थितींत कांहीं अंतर पडलें नाहीं. ज्या हिरण्यकशिपूनें आपल्या बाहुबलानें सर्व देवांस जिंकून त्यांचे अधिकार घेतले. ज्याचें नांव ऐकून इंद्रादि देव भीत होते, अशा बापानें प्र्हादास मारण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु तो त्याचा हेतू शेवटास गेला नाहीं. येथें उद्योगांत कांहीं कमी नाहीं. प्र्हादास दुष्टसंगति असावी तशी पूर्ण होती. परंतु नशीबांत

कांहीं फेर बदल झाला नाहीं. असे दृष्टांत पुष्कळ आहेत. त्यांचा विचार करून पहावा. संगति आणि उद्योग केल्यानें मूळसिद्धांतांत अंतर पडत नाहीं. मूळ सिद्धांताचें ज्ञान नसल्यामुळें संगति आणि उद्योग केल्यानें आपल्या स्थितींत अंतर पडतें, हा मनुष्याच्या मनाला परंपराप्राप्त भ्रम झाला आहे. उद्योग होणें व संगति चांगली मिळणें याचें मूल कारण काय? याचा विचार पूर्वी केला पाहिजे. म्हणजे कांहीं शंका रहात नाहीं. तो विचार पूर्ण न झाल्यामुळें उद्योग केला म्हणूनच आपल्या कार्याची सिद्धि झाली, असें वाटतें. परंतु उद्योगवाद्यांचा हा निश्चय शेवटीं रहात नाहीं. तेही कोठें कोठें दैवावर अवलंबून रहातात. नशीब मुख्य आहे. त्याच्या प्रेरणेनें सर्व कार्यें होतात, असा पक्ष खरा स्वीकारिला म्हणजे शास्त्रसंबंधानें किंवा लौकिक कांहींच अडचण येत नाहीं. केवळ उद्योगच खरा आहे, नशीब वगैरे कांहीं नाहीं असें मानिलें म्हणजे ईश्वर नाहीं असें म्हटल्यासारखेंच झालें. व त्याचा उपदेशही अर्थातच खोटा म्हणजे नाहींच असें म्हणणें प्राप्त झालें. " **जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च** " ( अर्थ–जो उत्पन्न झाला त्याला मृत्यु आहे. व जो मृत झाला त्याला जन्म आहे. ) " **कर्मणा जायते जंतुः कर्मणैवाभिलीयते** " ( अर्थ– प्राणी आपल्या कर्मानें उत्पन्न होतो, आणि कर्मानेंच म्हणजे नशीबानेंच मृत होतो. )

**" आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ "**

(अर्थ–अर्जुना, ब्रम्हदेवाच्या लोकापर्यंत असणाऱ्या सर्व लोकांस पु-

नरावृत्ति म्हणजे पुनः जन्मास येणें आहे. हे कौंतय, जो एकभावानें मद्रूप होतो, त्याला पुनर्जन्म नाहीं. )

" जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ "

( अर्थ—भगवान म्हणतात, अर्जुना, माझें दिव्य जन्म व कर्म जो खऱ्या प्रकारानें जाणतो तो मृत झाल्यावर पुनः जन्मास येत नाहीं तो मजप्रत प्राप्त होतो. )

" दैवाधीने शरीरेऽस्मिन् गुणभाव्येन कर्मणा ।
वर्तमानो बुधस्तत्र कर्तास्मीति निबध्यते ॥ "

(अर्थ—पूर्वकर्माधीन शरीरांत रहाणारा अज्ञानी जीव मीं कर्ता असा अहंकार झाल्यामुळें इंद्रियांकडून होणाऱ्या कर्मानें देहादिकांचे ठिकाणीं बद्ध होतो. )श्रीमद्भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायांत असें आहे कीं,—

" सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ॥
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥
देवान् भावयतानेन ते देवा भावयंतु वः ॥
परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥
इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ॥
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥
यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ॥
भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥

अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ॥
यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥
कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ॥
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥
एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ॥
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥ *"

( श्लोकांचें तात्पर्य–ब्रह्मदेवानें यज्ञ आणि ब्राह्मण उत्पन्न करून, ब्राह्मणांस सांगितलें कीं, या यज्ञानें तुम्हीं आपले सर्व मनोरथ पूर्ण करून घ्या. यज्ञानें देवांस संतुष्ट करा, म्हणजे देवही तुम्हांस तुष्ट करितील. आणि परस्परांस परम इष्टार्थाची प्राप्ति होईल. तुम्हांस आवडणारे पदार्थ देव देतील. त्यांनीं दिलेल्या अन्नादिकांनीं त्यांचा संतोष न करितां जो अन्नादिकांचा उपभोग करितो तो चोर आहे. यज्ञाचें अवशेष राहिलेलें अन्न जे भक्षण करितात, ते सर्वपातकापासून मुक्त होतात. जे आपल्या करितांच पाक करून भोजन करितात, ते पापाचें भक्षण करितात. अन्न भक्षण करून उत्पन्न झालेलें जें शुक्र आणि शोणित त्यांच्या द्वारें प्राणी उत्पन्न होतात. पर्जन्यापासून

---

* या श्लोकांचा संग्रह येथें करण्याचें कारण इतकेंच कीं, जगताचा कर्ता आहे व त्यानें सर्व गोष्टींची व्यवस्था शास्त्रद्वारा केली आहे. त्यांत पाप, पुण्य, धर्म, अधर्म, कर्म, जन्म, मृत्यु इत्यादि सर्व पदार्थ पूर्वसिद्धच आहेत. त्यांचा स्वीकार केला म्हणजे त्यांत देवाचा स्वीकार केलाच पाहिजे, अशा अभिप्रायानें संग्रह केला.

अन्न होतें. यज्ञापासून पर्जन्यवृष्टि होते. कर्मानें यज्ञ होतो. वेदापासून कर्मांची प्रवृत्ति होते. अक्षरब्रह्मापासून वेदाची उत्पत्ति आहे. अक्षरब्रह्म यज्ञाचे ठिकाणीं नित्य प्रतिष्ठित आहे. असें प्रवृत्त केलेलें चक्र याला अनुसरून जो चालत नाहीं, त्याचें आयुष्य व्यर्थ आहे. ) इत्यादि सर्व वाक्यें व्यर्थ गेलीं. यांचें कांहींच सत्यत्व राहिलें नाहीं. ईश्वर नाहीं असें म्हटल्यानें फारच अव्यवस्था होईल. वेदशास्त्रास विरुद्ध अशा या मताचा स्वीकार करणें हें कोणास बरें वाटेल तें वाटो. व त्या मतास कोणत्या ग्रंथांतील प्रमाण असेल तें असो. "**अंकुरादिकं कर्तृजन्यम्** " ( म्हणजे अंकुरादि जें वस्तुमात्र दिसतें त्याचा कोणीतरी कर्ता आहे. ) कर्त्यांशिवाय त्याची उत्पत्ति संभवत नाहीं. म्हणून कर्त्यांचा स्वीकार केला म्हणजे पुढच्या पुष्कळ पदार्थांचा स्वीकार करणें अवश्य आहे. मनुष्य, पशु, पक्षी इत्यादिकांत निरनिराळ्या समविषमस्थिति दिसतात, व त्यांजवर उद्योग संगति यांचीच कल्पना करून निर्वाह होत नाहीं. त्या ठिकाणीं शास्त्रानें सांगितलेली योजना केलीच पाहिजे. मातोश्रीच्या उदरांत असणारे जीव, एक लंगडा, एक पांगळा, एक बहिरा, एक मुका, एक भाग्यहीन, एक सर्वइंद्रियांनीं युक्त असून परम सुंदर, हजारों मनुष्यांचें पालन करणारा इत्यादि प्रकार दृष्टीस पडले म्हणजे तेथें केवळ उद्योगाच्याच स्वीकारानें निर्वाह होत नाहीं. पर्जन्यवृष्टि मनुष्याच्या उद्योगानें होत नाहीं. संतति उद्योगानें होत नाहीं. मनुष्य चांगला रूपवान्, बुद्धिमान्, पुष्कळ दिवस जगांत राहणारा, उद्योगानें होत नाहीं. या गोष्टी होण्यास कांहीं निराळी योजना करावी लागते. असो, सं-

गाती आणि उद्योग यांचा इतका वेळ विचार झाला. आतां पुनः उद्योगावर किती विश्वास ठेवावा याचा थोडा विचार केला पाहिजे.

केवढा चमत्कार हा ! आपल्या समक्ष होणाऱ्या हजारों गोष्टी आपण डोळ्यांनीं पहात आहों, परंतु बारकाईनें विचार न केल्यामुळें संशयांत पडतों. प्रातःकालापासून कांहीं तरी पावशेर अच्छेर धान्य मिळावें या हेतूनें दरिद्री फिरतात. त्यांजला संतोषानें कोणी भिक्षा घालित नाहीं. तरुण मनुष्य असला म्हणजे त्याला विचारितात कीं, अरे, तूं मजूरी करून आपलें पोट कां भरीत नाहीं ? तुला भिक्षा मागण्याचें काय कारण आहे ? कोठें तरी मजुरी केली म्हणजे पोटापुरतें अन्न मिळेल. सर्वांनींच भिक्षा मागण्याचा आरंभ केला तर काय करावें? भिक्षा घालवी कोणास व नाहीं म्हणावें कोणास ? असा त्याचा तिरस्कार करितात. आतां भिक्षा मागणें हा उद्योग नव्हे काय? भिक्षा मागणारास सकाळपासून बारा वाजेपर्यंत फिरावें लागतें. सुखाचा शब्दही कोठें ऐकूं येत नाहीं. व इतकी मेहेनत करून तरी दोन प्रहरीं जेवण पोटभर नाहीं. भिक्षा मागणारा म्हणजे अगदींच नीच, त्याला कांहीं ज्ञान नाहीं, केवळ मूर्खच तो असें मानितात. परंतु तो मूर्ख नव्हे. त्याच्या प्रारब्धानें त्याजला मूर्ख केलें. शूद्रक कवीनें दारिद्र्याविषयीं वर्णन केलें आहे कीं,–

" दारिद्र्यात्पुरुषस्य बांधवजनो वाक्ये न संतिष्ठते ।
सुस्निग्धा विमुखा भवंति सुहृदः स्फारीभवंत्यापदः ॥
सत्त्वं ह्रासमुपैति शीलशशिनः कांतिः परिम्लायते ।
पापं कर्म च यत्परैरपि कृतं तत्तस्य संभाव्यते ॥ "

( अर्थ-दरिद्रामुळें पुरुषाचें वाक्य बंधुवर्ग मानित नाहींत. अत्यंत स्नेह करणारे मित्र विमुख होतात, विपत्ति जास्ति वाढतात, सत्त्वाचा नाश होतो. स्वभावरूप चंद्राची कांति म्लान होते. दुसऱ्यानें केलेलें दुष्ट कर्म गरीबानेंच केलें असेल असें मानितात. ) भिक्षा मागणें सोडून मजुरी करण्यास आरंभ केला तरी दैवहीनाचा त्रास कधींही कमी होत नाहीं. दुसऱ्याची सेवा करणें म्हणजे ज्ञात्यांनीं त्या वृत्तीस श्ववृत्ति असें नांव ठेविलें आहे, व वैराग्यसंपन्न भर्तृहरीनीं सेवाधर्माचें वर्णन केलें आहे कीं,–

" मौनान्मूकः प्रवचनपटुर्वातुलो जल्पको वा ।
धृष्टः पार्श्वे वसति च सदा दूरतस्त्वप्रगल्भः ॥
क्षांत्या भीरुर्यदि न सहते प्रायशो नाभिजातः ।
सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ॥ "

( अर्थ-सेवक बोलला नाहीं म्हणजे मुका, चांगला पुष्कळ बोलणारा असला म्हणजे वाचाळ किंवा पुष्कळ बडबड करणारा, यजमानाजवळ बाजूस उभा राहिला म्हणजे दांडगा, दूर जाऊन बसला म्हणजे असमंजस, दुसरा जें बोलेल तें सहन केलें म्हणजे भित्रा, सहन केलें नाहीं म्हणजे कुलीन नाहीं असें म्हणतात. मिळून सेवा करणें हें फार कठीण आहे. तें योग्यांसही कळत नाहीं. ) अशी सेवा करून तरी सुखाची प्राप्ती किती आहे हें उघडच आहे. येथें उद्योग करून सुख होत नाहीं असा अनुभव आला म्हणजे उद्योगाविषयीं उदासीन होतो, आणि पुनः नशीबावर सर्व दोष आणितो.

प्रथम उद्योग करून त्यांत मनाप्रमाणें फलप्राप्ति झाली नाहीं म्हणजे मग दैवाचे अवलंबन करणारांचा हा प्रकार झाला.

आतां उद्योग कांहींच न करितां पहिल्या पासूनच दैवावर भरवंसा ठेऊन रहातात, त्यांची सुखस्थिति पहा. कांहीं साधु असे आहेत कीं, मलमूत्रोत्सर्ग, स्नान इत्यादि कृत्यांशिवाय आपल्या आसनावरून मूळींच उठत नाहींत. स्वस्थपणानें भगवच्चिंतन करीत बसतात. आपल्यास भोजनादिकांची प्राप्ति कशी होईल अशी चिंता त्यांचे स्वप्नांतही त्यांजला नसते. ते असें मानितात कीं,–

" यो मे गर्भगतस्यापि वृत्तिं कल्पितवान् प्रभुः ।
शेषवृत्तिविधानार्थं स किं सुप्तोथ वा मृतः ॥ "

( अर्थ–मातोश्रीच्या उदरांत असतां ज्यानें माझी वृत्ति चालविली म्हणजे मला अन्नादिरसांनीं वांचविला. तो आतां मला वांचविणार नाहीं काय ? ) असा ज्यांचा पूर्ण निश्चय झाला, त्यांच्या दैवयोगानें असा चमत्कार दृष्टीस पडतो कीं, दुधाचीं भांडीं भरलेलीं जवळ आहेतच. ताजेपेढे आणून देण्याच्या उद्योगास लोक लागलेच आहेत. (तमाखूच्या पुड्या जवळ नाहीं, असा दिवस कधींच येत नाहीं. ( धुमी पेटविण्यास लांकडें येतच आहेत.) महाराजांनीं कांहीं तरी भाषण करावें म्हणून लोक हात जोडून तोंडाकडे पहात बसलेच आहेत, महाराज कोठें जात नाहीं, कोणा जवळ कांहीं मागत नाहींत, फारतर काय परंतु कोणांशीं जास्ती भाषण सुद्धां करीत नाहींत. आपल्या मनास वाटलें तर कोणाबरोबर दोन शब्द बोलतात, नाहीं तर ईश्वर-

चिंतनावांचून दुसरें कांहीं जाणत नाहींत. अशी स्तुति सतत चालूच असते. पर्जन्यकाळीं महाराजांच्या शरीरावर होणाऱ्या वृष्टीच्या निवारणार्थ लोक सर्व तजवीज करितात. थंडीच्या दिवसांत शेकण्याकरितां लांकडें वेळोवेळीं येतात, अशा व्यवस्था असलेल्या पुष्कळ लोकांच्या पहाण्यांत आहेत. मुंबई सारख्या शहरांत तर कोणी साधु आला म्हणजे त्याच्या सेवेला एकानें आरंभ केलेला पाहून त्याचे अनुयायी हजारों लोक होऊन तो साधु किती योग्यतेचा आहे, याचा पूर्ण विचार न करितां त्याच्या भजनीं लागतात. साधूच्या भजनीं विचार केल्याशिवाय स्त्रिया लागतात, यांत विशेष आश्चर्य नाहीं. कारण त्या अज्ञानी विचारशून्य आहेत. परंतु पुरुष चांगले ज्ञाते असूनही त्यांच्या नादीं लागतात याचें खरें तात्पर्य अद्यापपर्यंत कोणासच कळलें नाहीं, असें म्हणण्यास चिंता नाहीं.

थोर थोर श्रीमंत ज्ञाते त्या साधूंच्या नादीं लागतात, यांत इतकेंच तत्त्व आहे कीं, ते साधू मोठे दैववान् असल्यामुळें त्यांचें त्या वैराग्यास्थितींत प्रारब्धानुसार सर्व उपभोग त्यांजला झाले पाहिजेत. थोर थोर श्रीमंत जर त्यांच्या नादीं लागले नाहींत तर साधूंच्या प्रारब्धानुसार जे उपभोग त्यांजला मिळावयाचे ते मिळण्यास दुसरें साधन नाहीं, म्हणून प्रारब्धयोगानें श्रीमंत लोक वश होतात. आणि पूर्वी सांगितल्या प्रमाणें त्यांची सेवा करितात. हा दैवयोगच म्हटला पाहिजे. पुढें कांहीं काळानें प्रारब्ध भोगाचा क्षय झाला म्हणजे कांहीं कारणानें परस्परांच्या अंतःकरणांत विपरीत भावना उत्पन्न होऊन सर्वमान्य साधूंच्या सेवेविषयीं सेवक उदासीन होतात. आणि ज्या साधूकरितां

आपलें पुष्कळ द्रव्य खर्च केलें, त्यांच्या निंदेस हळू हळू आरंभ करि-तात. असा प्रसंग आला म्हणजे साधूंचें प्रारब्ध कर्म उपभोगानें क्षीण झालें, असें समजलें पाहिजे. कारण साधूंचें वर्तन सततसारखें असून जर कारणावांचून सेवकांच्या अंतःकरणांत विपरीत भाव उत्पन्न होऊं लागला, तर येथें प्रारब्धाशिवाय दुसरी कांहीं कल्पना करितां येत नाहीं. साधूंच्या नादीं लागणें हें प्राचीन कालापासून प्रसिद्धच आहे. प्रत्यक्ष श्रीकृष्णाचे बंधु बलराम दादा हे अर्जुन स्वामीच्या बाह्यस्थितीवरून नादीं लागून त्यांजवर परम प्रेम आणि विश्वास ठेविला. त्यांचीं स्तुति कृष्णप्रभृति सर्वांजवळ करून त्यांजला द्वार केंत आणून आपल्या राजवाड्यांत रहाण्यास जागा दिली. आणि स्वामीची चांगल्या प्रकारानें सेवा करण्याकडे सुभद्रेची योजना केली. पुढें कांहीं कालानें स्वामी सुभद्रेस घेऊन पळाले, तेव्हां बलरामास कृष्णानें समजुतीच्या दोन गोष्टी सांगून त्यांचा राग शांत केला एकंदर विचार करून पहातां उद्योग केल्यानें सुख होतें, आणि उद्योग न केल्यानें दुःख होतें, असेंही ठरत नाहीं.

भिक्षा मागणारा किंवा दुसऱ्याची सेवा करणारा यांच्या सुखाच पूर्वीं विचार केला, आणि प्रारब्धावर विश्वास ठेऊन कांहीं उद्योग न करणाऱ्या साधूंला कशा तऱ्हेचीं सुखें होतात, हेंही येथें सांगितलें. हे सांगितलेले दोन्ही प्रकार सर्व लोकांच्या अनुभवास येणारे आहेत. परंतु उद्योग थोर किंवा प्रारब्ध थोर असें जर विचारिलें तर निश्चया-त्मक सांगणें फार कठीण आहे. उद्योग थोर म्हणावा तर कधीं कधीं उद्योग करूनही दुःख भोगावें लागतें. कधीं कधीं उद्योग न

करितां सुखाची प्राप्ति होते. तेव्हां सुखदुःखप्राप्तीचा हेतु काय याचा निश्चयच होत नाहीं. श्रीमद्भागवताच्या प्रथमस्कंधांत राजा परीक्षित कलीचा निग्रह करण्या करितां बाहेर फिरत असतां गाईचें रूप धारण करणारी पृथ्वी, व बैलाचें रूप धारण करणारा धर्म या दोघांचें सुखदुःखाविषयीं कांहीं भाषण चाललें होतें. तेथें राजा प्राप्त झाला. आणि पहातो तर कोणी एक शूद्र आपल्या हातांत दंड ( काठी ) घेऊन गाय आणि बैल यांस मारीत आहे. गाईच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या आहेत, असें पाहून राजा त्या शूद्रास म्हणाला कीं, मीं पृथिवीचें पालन करित असतां तूं अशा अधर्मानें वागणारा कोण आहेस ? असें विचारिलें. आणि त्या धर्मरूप वृषभास प्रश्न केला कीं, तूं एकपायानें कां चालतोस ? आणि निरपराधी असतां तुला दुःख देणारा कोण त्याचें नांव सांग. म्हणजे त्या दुष्टास शासन करितों. कारण आपआपल्या धर्मानें चालणाऱ्या प्रजेचें पालन करणें हाच राजाचा धर्म आहे. असें राजाचें भाषण ऐकून धर्म म्हणाला, राजा, पीडित झालेल्या जनांस अभय वचन देऊन त्यांजला दुःखापासून मुक्त करणें हें आपल्या सारख्या सत्कुलांत उत्पन्न होणारांस योग्यच आहे.

**“ न वयं क्लेशबीजानि यतः स्युः पुरुषर्षभ ।**
**पुरुषं तं विजानीमो वाक्यभेदविमोहिताः ॥ ”**

( अर्थ–या जगांत मनुष्यास सुखदुःखाची प्राप्ति कोणापासून होते, या सुखदुःखाच्या प्राप्तीचें कारण काय हें आम्हीं वाद करणारांच्या अनेकमतांनीं मोहित झाल्यामुळें कांहीं जाणत नाहीं. ) सुखदुःखा-

च्या प्राप्तीविषयीं अनेकांचे अनेक विकल्प आहेत. त्यांचा एक नि-श्चय करून सांगतां येत नाहीं.

**" केचिद्विकल्पवसना आहुरात्मानमात्मनः ।**
**दैवमन्येऽपरे कर्म स्वभावमपरे प्रभुम् ॥**
**अप्रतर्क्यादनिर्देश्यादिति केष्वपि निश्चयः ।**
**अत्रानुरूपं राजर्षे विमृश स्वमनीषया ॥"**

( अर्थ—योगी असें म्हणतात कीं, आपणच आपल्या सुखदुःखास कारण आहों. याच अर्थाचें वाक्य श्रीमद्भगवद्गीतेंत आहे कीं,— **" आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः "** ( अर्थ—आपणच आपला बंधु, आपणच आपला शत्रु, म्हणजे सुखदुःखास कारण ज्याचा तोच आहे. दुसरा कोणीं नाहीं असें तात्पर्य. ) दुसरे मतवादी दैवज्ञ असें म्हणतात कीं, ग्रहादि देवता सुखदुःखाचें कारण आहे. मीमांसक सुखदुःखाचें कारण कर्म असें मानितात. लोकायतिक म्हणजे देहालाच आत्मा असें मानणारे देहात्मवादी बौद्ध, स्वभावच सर्वांस कारण आहे असें म्हणतात. कोणीं अशी कल्पना करितात कीं, जो प्रत्यक्ष दाखवितां येत नाहीं किंवा ज्याच्या विषयीं तर्क करितां येत नाहीं, अशा परमेश्वरापासून सर्वांस सुखदुःखाची प्राप्ति होते. अशीं अनेकांचीं अनेक मतें आहेत. या करितां राजन्, आपण आपल्या बुद्धीनें सुखदुःखादिकांचा जो निश्चय करणें असेल तो करावा. याविषयीं माझा कांहींच निश्चय ठरत नाहीं. मनुष्यास सुखदुःखादि कोणापासून होतें याविषयीं धर्म आणि राजा परीक्षित यांचा झालेला संवाद यांतही

सुखदुःखाचें कारण उद्योग किंवा दैव याचा एक निश्चय करितां आला नाहीं. याच अर्थाला अनुसरून एक कवि म्हणतो कीं,–

" वैद्या वदंति कफपित्तमरुद्विकारान् ।
ज्योतिर्विदो ग्रहगतिं परिवर्तयंति ।।
भूताभिषंग इति भूतविदो वदंति ।
प्राचीनकर्म बलवन्मुनयो वदंति ।। "

( अर्थ–कोणा मनुष्यास कांहीं दुखणें येऊन फार क्लेश होऊं लागले म्हणजे वैद्यांस विचारिलें तर ते कफ किंवा वात अथवा पित्त यांचा विकार झाला आहे, त्यामुळें असें दुःख होतें म्हणून सांगतात. जोशीबुवांस विचारिलें म्हणजे ते शनि बारावा; गुरु चवथा, मंगळ आठवा, राहू जन्मस्थ असे ग्रह असल्यामुळें पीडा होते असें म्हणतात. मंत्री भूतबाधा म्हणून सांगतात. भूत, भविष्य, वर्तमान जाणणारे ज्ञाते, पूर्वी केलेल्या कर्माचें फल आहे. ) हें भोगिल्याशिवाय संपणार नाहीं, असा निश्चय करितात. मिळून एकाचें मत एकास मिळत नाहीं. त्यामुळें विचारणाराचा विश्वास एकावर रहात नाहीं. उपाय कोणता करावा याचा पूर्ण निश्चय होत नाहीं. सर्वच गडबड होऊन जाते. त्याप्रमाणेंच उद्योग, संगति, नशीब इत्यादिकांचा वाद असल्यामुळें एकाचेंच अवलंबन करून रहातां येत नाहीं. उद्योग करून कार्यसिद्धि झाली म्हणजे उद्योग थोर आहे असें वाटतें. श्रीमंताच्या संगतीनें कांहीं लाभ झाला म्हणजे संगति मुख्य आहे असा निश्चय होतो. कांहींच उद्योग न करणारास द्रव्यादिकांचा लाभ झाला म्हणजे नशीब थोर असें वाटतें. सर्व सुखदुःखाचें का-

रण काल आहे असेंही कोणीं म्हणतात. म्हणजे ज्या कालांत जें होणारें आहे तें प्रयत्नाशिवाय होतें. वसंतऋतूंत कोणीं कांहीं प्रयत्न न करितां अतिशय उन्हाळा होतो. सूर्य आपल्या प्रखर किरणांनीं सर्व रसांचा शोष करितो. मोठमोठाल्या नद्या, सरोवरें आटून जातात. कांहीं ठिकाणीं मनुष्यास पिण्यापुरतें पाणी मिळविण्याकरितां पुष्कळ खटपट करावी लागते, असें असून वसंतकालामुळें सर्व वृक्षांस नूतन पल्लव फुटतात. सर्वजातीच्या पुष्पांचा प्रादुर्भाव होतो. या वसंतऋतूस पुष्पसमय असें नांव त्याच्या अर्थाला अनुसरून ज्ञात्यांनीं ठेविलें आहे. सर्वपुष्पांचा समय म्हणजे उत्पत्तिकाल हाच आहे. या ऋतूंत होणाऱ्या सर्व गोष्टी कालानेंच होतात. येथें दुसरी कांहीं कल्पना नाहीं. तसाच ग्रीष्मऋतु म्हणजे उन्हाळ्याची परम सीमा; परंतु त्या ऋतूंत सर्व पृथ्वी शुष्क होत असून आम्रफलें रसानें परिपूर्ण झालेलीं किती मधुर लागतात, अशा उष्णकालांत आम्रफलें परिपुष्ट होतात. ह्यांत मनुष्याचा उद्योग काय आहे ? खरोखर विचार करून पाहिलें तर सूर्याच्या तीक्ष्ण किरणांनीं अत्यंत तप्त झालेल्या भूमीवरील कोमल झाडांस पुष्प, पल्लव, फळें येणें हें मोठें आश्चर्य नव्हे काय?

या सृष्टींतील पदार्थांविषयीं कोणीं सूक्ष्मरीतीनें विचार करीत नाहीं. विचार केला तर असे अनेक अद्भुत चमत्कार आहेत. (गरोदर स्त्री कांहीं उद्योग न करितां नऊ महीने पूर्ण झाले म्हणजे प्रसूत होते.) या प्रसूतीचें कारण काल असें म्हणण्यास काय चिंता आहे. मनुष्यास बाल्य, यौवन आणि वार्धक्य या तीन अवस्था कालानेंच प्राप्त होतात. बंदीशाळेंत परम संकटांत असणारे अपराधी पुरुष कालगतीनें सुटतात.

मनुष्यास उच्चस्थिति किंवा नीचस्थिति येण्याचें कारण काल. ज्या वस्तूचा नाश होण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केले, तथापि कांहीं कमी जास्ती होत नाहीं; त्याच वस्तूचा नाश काल प्राप्त झाला म्हणजे कांहीं खटपट न करितां ती स्वभावतः नष्ट होते. या जगताचा नाश करावा असें जर कोणीं मनांत आणून हजारों लोक एकाठिकाणीं करून त्यांच्या मदतीनें नाश करण्याचा आरंभ केला तर त कार्य कधींही उद्योगानें सिद्धीस जाणार नाहीं. कालानें पहा काय चमत्कार होत आहे! एका कवीनें म्हटलें आहे कीं,–

" कालेन क्षितिवारिवह्निपवनव्योमादियुक्तं जग- ।
द्ब्रह्माद्याश्च सुराः प्रयांति विलयं विद्मो विचारादिति ॥
पश्यामोपि विनश्यतोऽनवरतं लोकाननेकान्सुधा " इति.

(अर्थ–पृथ्वी, जल, अग्नि, वायु आणि आकाश हीं पंच महाभूतें, स्थावरजंगमात्मक जगत, ब्रम्हादिक देव या सर्वांचा नाश कालानें होतो. असें आम्हीं विचारानें जाणतों. व अनेक लोक नित्य मृत होतात हें प्रत्यक्ष पहातों.) हा ब्रह्मादिक देवांचा नाश कालाशिवाय करण्यास कोण समर्थ आहे? जें होण्यास योग्य नाहीं तेंही कालानें होतें.

" अप्सु प्लवंते पाषाणा मानुषा घ्नंति राक्षसान् ।
कपयः कर्म कुर्वंति कालस्य कुटिला गतिः ॥

( अर्थ–कालगतीनें पाण्यावर पाषाण तरतात, मनुष्य राक्षसांस मारितात, वानर मोठमोठीं कामें करितात, अशी कालगति फार विलक्षण आहे. ) कालाचा आणखी चमत्कार प्रत्यक्ष असा दिसतो कीं, श्रीमंत

किंवा गरीब आपल्या लग्नाच्या वेळीं मुलगी चांगली शहाणी सुरेख सुदृढ निरोगी अशी पाहून करितात. पुढें कांहीं कालानें त्या मुलीच्या कानांस किंवा डोळ्यांस कांहीं विकार होऊन पीडा होऊं लागते. त्या पीडेच्या निवारणार्थ सासू सासरा इत्यादि पुष्कळ औषधें करितात. त्या औषधांनीं कांहीं गुण आला नाहीं ह्मणजे देवास नवस सायास करितात, तथापि त्या खटपटी सफल होत नाहींत. असें झालें म्हणजे पतीस फार त्रास होतो, कोणी परकी मनुष्य आला म्हणजे त्याला पूर्वीचें वर्तमान कांहींच माहीत नसल्यामुळें म्हणतो कीं, अहो महाराज, अशी आंधळी बायको आपण कां केली ? या पेक्षां लग्न झालें नसतें तर बरें. हा नित्य त्रास मागें लागला, मुलगी कुरूप काळी असलेली बरी. परंतु व्यंग फार वाईट. इत्यादि त्याचें भाषण ऐकून जवळ असलेलीं मनुष्यें सांगतात, अहो! ही मुलगी केली तेव्हां हिचे डोळे फार चांगले होते. हिला कांहींच खोड नव्हती. परंतु आमच्या दैवयोगानें व कालसत्तेनें हिचे डोळे दोन वर्षांत फारच बिघडून हल्लीं कांहींच दिसत नाहीं; असा प्रसंग येऊन पोंचला आहे.

कालगति काय आहे कांहीं कळत नाहीं. कालाला उद्देशून लोकांचीं अशीं भाषणें होतात. कालगतीनेंच रात्र जाऊन दिवस येतो. दिवसाचा नाश कालच करितो. लोकांस मृत्यु कालानेंच येतो. मनुष्यें कालगतीनें जन्मास येतात. कृत, त्रेता, द्वापार, कलि हीं नांवें कालाचींच आहेत. पर्जन्यकाल, शीतकाल आणि उष्णकाल यांच्या येण्याजाण्यास हेतु कालाशिवाय दुसरा कोणी आहे काय ? पूर्वीं सर्वेंद्रियांनीं संपन्न असणारास अंधत्व, बधिरत्वादि प्राप्त होण्यास कारण काल आहे. ( कालानें साक्षात् भगवान् विष्णूस मत्स्य, कूर्म,

वराह हे तीन अवतार निंद्ययोनींत घ्यावे लागले. तसाच नारसिंह अवतार स्तंभांत धारण करावा लागला. अहो! कालसत्तेनें जगन्नि-यंत्या लक्ष्मीपतीस बलीच्या द्वारीं जाऊन भिक्षा मागावी लागली. पर-शुराम अवतारांत स्वकीय धर्माचा त्याग करून दुसऱ्या धर्माचा स्वी-कार करावा लागला. सदाचरणसंपन्न इंद्रादिदेवांस साह्य करणारा जो राजा दशरथ त्याचा पुत्र होऊन राज्यसुखाचा विषवत् त्याग क-रून कंदमूलादिकांच्या भक्षणानें चवदा वर्षे वनवास केला. तेथेंहीं अनेक दुःखें भोगिलीं. पुढें कृष्णावतारांत आईबाप बंदीशाळेंत असतां तेथें उत्पन्न होऊन गोकुळांत गवळ्याचे घरीं गाई वासरांचें रक्षण क-रून उदरनिर्वाह केला. कालगतीनें कंसादिकांचा नाश झाल्यावर समु-द्रांत द्वारका नगरी स्थापन करून तेथें राहिले. वाचक हो! सर्वलो-कांत चांगला असा वैकुंठ लोक सोडून समुद्रांत घर बांधून राहणें ह्या-कृत्यास काय म्हणावें. अशीं दुःखें होण्याचें कारण काल नव्हे काय? ह्या सर्वस्थिति कालानेंच प्राप्त होतात यांत कांहीं संशय नाहीं. सर्व कर्मांस कालच कारण आहे. याविषयीं श्रीमद्भागवताच्या बारा-व्या स्कंधांत शुकाचार्यांनीं परीक्षित राजास सांगितलें आहे कीं, भूमी-वर अत्यंत ममत्व करणाऱ्या राजांस पाहून भूमी असें म्हणते कीं,-

"ममैवेयं मही कृत्स्ना न ते मूढेति वादिनः ।
स्पर्धमाना मिथो घ्नंति म्रियंते मत्कृते नृपाः ॥"

( अर्थ-हे मूर्खा, सर्व पृथ्वी माझी आहे. तुझी नव्हे. असा वाद करणारे आणि परस्पर स्पर्धा करणारे राजे माझ्या निमित्तानें दुसऱ्यास मारितात, आणि आपण मरतात. आजपर्यंत थोर थोर होऊन गेलेल्या राजांचीं नावें सांगतात कीं,-

" पृथुः पुरूरवा गाधिर्नहुषो भरतोऽर्जुनः ।
मांधाता सगरो रामः खट्वांगो धुंधुहा रघुः ॥
तृणबिंदुर्ययातिश्च शर्यातिः शंतनुर्गयः ।
भगीरथः कुवलयाश्वः ककुत्स्थो नैषधो नृगः ॥
हिरण्यकशिपुर्वृत्रो रावणो लोकरावणः ।
नमुचिः शंबरो भौमो हिरण्याक्षोथ तारकः ॥
अन्ये च बहवो दैत्या राजानो ये महेश्वराः ।
सर्वे सर्वविदः शूराः सर्वे सर्वजितोजिताः ॥
ममतां मय्यवर्तंत कृत्वोच्चैर्मर्त्यधर्मिणः ।
कथावशेषाः कालेन ह्यकृतार्थाः कृता विभो ॥ "

(तात्पर्य–पृथु, पुरूरवा, गाधि इत्यादि ज्ञाते शूर ज्यांचा कधीं पराजय झाला नाहीं, ज्यानीं शत्रूंस जिंकिलें, स्वतः मरणधर्मी असून माझ्या ठिकाणीं अत्यंत ममत्व ठेविणारे हजारों राजे सर्व मनोरथ पूर्ण होण्यापूर्वींच कालानें कथावशेष केले. म्हणजे ज्या राज्यांच्या हल्लीं गोष्टी मात्र शेष राहिल्या आहेत. दुसरें कांहीं नाहीं.) जन्म, मृत्यु, सुख, दुःख इत्यादिकांस कालच कारण आहे, असें म्हणणारांचें हें मत सांगितलें. उद्योगवादी जसा उद्योगाचा स्वीकार करितात, तसाच या मताचा स्वीकार केला तर काय अडचण येईल? बारीकदृष्टीनें पाहिलें तर सर्वांस कारण काल आहे. व ज्ञात्यांनींही त्याचा स्वीकार पुष्कळ ठिकाणीं केलेला दिसतो. उद्योग किंवा नशीब यांच्यावर अवलंबून राहिलें ह्मणजे जशी कार्यसिद्धि होते तशीच कालाचा अंगीकार केला म्हणजे होईल. रोगानें पीडित झालेला मनुष्य, पंधरा दिवस,

महिना, दोन महिने जो कालाचा नियम असेल, तो पूर्ण झाला म्हणजे चांगला बरा होतो. उद्योग प्रधान मानून औषधोपचार केला तरी तत्काल सर्व दुःखें दूर होऊन सुखाची प्राप्ति होते असा अनुभव नाहीं. ( मिळून उद्योग, नशीब, काल यांतून कोणासही प्रधान मानिलें तरी फलप्राप्ति सारखीच दिसते. )

कोणीं असें म्हणेल कीं, रोगानें पीडित झालेल्या मनुष्यास कांहीं औषध न देतां कालाचें अवलंबन करून बसलें तर त्याची पीडा दूर होईल काय? याचें असें उत्तर दिलें पाहिजे कीं, कधीं कधीं रोग्यास औषध देण्याचा आरंभ केला म्हणजे त्याची प्रकृति पहिल्यापेक्षां जास्ति बिघडते. आणि जें दुःख पूर्वीं होत असतें त्यापेक्षां अधिक होऊं लागतें. एकदां असें झालें म्हणजे मग पुनः औषध देऊन त्या रोग्याची प्रकृति पूर्वावस्थेंत आणावी लागते. औषध चालू असलें तरी कधीं जास्ति कधीं कमी ही भावना आहेच. दोन दोन महिने गोळया, काढे घेऊन घेऊन रोगी त्रासला म्हणजे सर्व सोडून देतो, आणि प्रारब्धावर विश्वास ठेऊन रहातो. त्यामुळें त्याला कांहीं सुख होतें. कदाचित् दैवयोगानें कांहीं उपाय न करितां तो रोगमुक्त होतो. " उघडच्या डोळयांनीं प्राण जात नाहीं " अशी एक म्हण आहे, त्या म्हणीला अनुसरून लोक वागतात. म्हणजे दुखणें आल्यावर औषध घेतल्यावांचून रहाणें हें मनाला बरें वाटत नाहीं, व लोकांचा शब्दही रहातो. तो दूर करण्याकरितां औषध चालू ठेविलें पाहिजे. औषध चालू असलें म्हणजे कोणांस कांहीं दोष ठेवितां येत नाहीं, व मनाची शंका रहात नाहीं. दुखणें जाण्याचा काल आल्याशिवाय किंवा दैव अनुकूल झाल्याशिवाय तें जात नाहीं. हा तर सिद्धांतच

आहे. या उत्तरावरही बोलणें आहे. औषधानें कधीं कधीं प्रकृति जास्ती बिघडते. पुष्कळ दिवस औषध घेतलें तथापि गुण येत नाहीं, याचें कारण औषध देणारा वैद्य " **पीयूषपाणिः कुशलः क्रियासु** " ( हातास चांगलें यश सर्व क्रियेंत कुशल ) असा असला म्हणजे कांहीं बिघडत नाहीं. तसा वैद्य मिळाला नाहीं म्हणजे औषधाचा गुण नाहीं, असा अनुभव येतो. वैद्यांस चांगली खरी परीक्षा होत नाहीं, ती न झाल्यामुळें कांहींतरी औषध देतात, त्याचा गुण न येतां प्रकृति अधिक बिघडते हें बरोबर आहे. असें समाधान केलें तरी यावर बोलणें आहेच. वैद्य खात्रीचा असून पुष्कळ लोकांच्या अनुभवानें योग्य असा ठरलेला पाहून त्याचें जरी औषध घेतलें तरी रोग्याच्या प्रारब्धानें कांहीं फलप्राप्ति होत नाहीं. ज्या औषधाचा जो गुण आहे तो कांहींतरी अनुभवास आल्यावांचून रहात नाहीं, हें खरें आहे. परंतु तो गुण क्षणिक येतो. पुढें कांहीं नाहीं. पोट फार दुखूं लागलें म्हणजे कितीही औषधें घेतलीं तरी त्यांचा क्षणभर सुद्धां गुण येत नाहीं. अशा प्रसंगांत तीं औषधें शक्तिहीन कां होतात, याचें कांहीं अनुमान करितां येत नाहीं. कालास कारण मानणारांचें असें मत आहे. यांत सर्व विश्वास कालावर आहे. उद्योग कालानेंच होतो. त्याचें फल कालानेंच येतें. सर्व सुखदुःखें त्याच्याच योगानें होतात. या मतांत जगताच्या उत्पत्ति स्थिति आणि प्रलय यांस कालच कारण आहे असा कालवाद्यांचा अभिप्राय दिसतो.

स्वभाववादी बौद्ध सुखदुःखादिक स्वभावानेंच होतें असें ह्मणतात. सर्व सृष्टी स्वभावानें झाली आहे. स्वभाव ह्मणजे " **स्वस्य भावः स्वभावः** " ह्मणजे वस्तुमात्राचा धर्म त्या धर्मानेंच सर्व गोष्टी होतात

म्हणजे चुना, आणि हळद एकाठिकाणीं केलीं म्हणजे त्यापासून तांबडा रंग उत्पन्न होतो. या तांबड्या रंगाचा उत्पादक कोण ? असा प्रश्न केला तर वस्तूचा तो स्वभावच आहे असें सांगतात. चुना पाहिला तर पांढरा, हळद पिंवळी, या दोघांच्या संयोगानें तांबडा रंग झाला. विड्याचें पान हिरवें किंवा पिंवळें, चुना पांढरा, कात पांढरा, सुपारी पांढरी हे सर्व पदार्थ पांढरे असून तांबूल भक्षण केलें म्हणजे तोंड तांबडें होतें; हें करणारा कोण ? याचें उत्तर स्वभाव. असो, एकाच भूमींत एक पाण्यानें ऊंस मधुर, चिंच अम्ल, मिरची तिखट, हिरडा तुरट, निंब कडू, मोहरी, कांदा, लसूण इत्यादि निरानिराळ्या रसाचे पदार्थ स्वभावतः उत्पन्न होतात. यांस कोणाच्या उद्योगाची अपेक्षा नाहीं. सर्व पदार्थ भूमींत लावणें व त्यांजला पाणी घालणें हें मनुष्याचें कर्म आहे. परंतु त्यांत मधुर, अम्ल, तिखट इत्यादि रसांचीं उत्पत्ति करण्यास मनुष्य उद्योगानें समर्थ होईल काय ? रसाची उत्पत्ति स्वभाववाद्याच्या मतानें स्वभावतःच होते. ईश्वराचें अस्तित्व मानणारे सर्व ईश्वरापासून होते असें म्हणतात.

आतां या अनेक मतांचा विशेष विस्तार येथें लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं. चाललेल्या प्रसंगास अनुसरून आलेल्या विषयाचें थोडें प्रतिपादन केलें. केवळ नशीबावर किती अवलंबून रहावें याचा विचार मागें ठिकठिकाणीं केलाच आहे. व तें मुख्य असें मानिल्यावर सर्वप्रकारांनीं त्याचेंच अवलंबन करावें हें अर्थात् सिद्ध झालें. परंतु त्याचें अवलंबन मागें सांगितलेले सर्व प्रकार मनांत आणून केलें पाहिजे. आतां हा सर्व निबंध वाचून अनेकांचीं अनेक मतें पाहून जगांत कसें वागावें, उद्योगावर विश्वास ठेवावा, किंवा दैवावर पूर्ण भरवंसा ठेऊन स्वस्थ बसावें ?

काय केलें असतां आपली इष्टसिद्धि होईल, याचा निश्चय इंद्र आणि बृहस्पति यांचा संवाद देवीभागवताच्या पंचमस्कंधांत आहे त्याचा अभिप्राय मनांत आणून केला पाहिजे.

महिष नांवाचा दानव अत्यंत प्रबल होऊन इंद्राबरोबर युद्ध करावें आणि अमरावती आपल्या स्वाधीन करून घ्यावी असा निश्चय करून इंद्रलोकास येत आहे, असें वर्तमान दूतांच्या मुखानें इंद्रानें ऐकिलें. आणि परम भयभीत होऊन आपले गुरु जे बृहस्पति त्यांच्या जवळ जाऊन हात जोडून प्रार्थना केली कीं, गुरुमहाराज, महिष नांवाचा दानव अत्यंत पराक्रमी असून आपल्या बरोबर युद्ध करण्याकरितां येण्याच्या तयारींत आहे. आतां पुढें काय उपाय करावा हें कृपा करून सांगणारा आपल्याशिवाय दुसरा कोणीं समर्थ नाहीं. अशी इंद्राची प्रार्थना ऐकून बृहस्पति सांगतातः-

"गुरुरुवाच—स्वस्थो भव सुरेंद्र त्वं धैर्यमालंब्य मारिष ।
व्यसने च समुत्पन्ने न त्याज्यं धैर्यमाशु वै ॥
जयाजयौ सुराध्यक्ष दैवाधीनौ सदैव हि ।
स्थातव्यं धैर्यमालंब्य तस्माद्बुद्धिमता सदा ॥
भवितव्यं भवत्येव जानन्नेव शतक्रतो ।
उद्यमः सर्वथा कार्यो यथा पौरुषमात्मनः ॥
मुनयोऽपि हि मुक्त्यर्थमुद्यमैकरताः सदा ।
दैवाधीनं च जानंतो योगध्यानपरायणाः ॥
तस्मात्सदैव कर्तव्यो व्यवहारोदितोद्यमः ।
सुखं भवतु वा मा वा दैवे का परिदेवना ॥

विना पुरुषकारेण कदाचित्सिद्धिमाप्नुयात् ।
अंधवत्पंगुवत्कामं न तथा मुदमावहेत् ॥
कृते पुरुषकारेपि यदि सिद्धिर्न जायते ।
न तत्र दूषणं तस्य दैवाधीने शरीरिणि ॥
कार्यसिद्धिर्न सैन्येऽस्ति न मंत्रे मंत्रणे न च ।
न रथे नायुधे नूनं दैवाधीना सुराधिप ॥
बलवान् क्लेशमाप्नोति निर्बलः सुखमश्नुते ।
बुद्धिमान् क्षुधितः शेते निर्बुद्धिर्भोगवान् भवेत् ॥
कातरो जयमाप्नोति शूरो याति पराजयम् ।
दैवाधीने तु संसारे कामं का परिवेदना ॥
उद्यमे योजयेन्नूनं भवितव्यं सुराधिप । "

( अर्थ—इंद्रा, स्वस्थ हो, धैर्य धारण कर, दुःखाचा प्रसंग प्राप्त झाला असतां धैर्य सोडूं नये. जय अथवा पराजय हे प्रारब्धाधीन आहेत असा बुद्धिमान् पुरुषानें पूर्ण विचार करून स्वस्थ रहावें. होणारी गोष्ट होतच आहे. तींत कांहीं कमी जास्ती करितां येत नाहीं. परंतु त्या संबंधानें जो उद्योग करणें असेल तो आपल्या शक्तीप्रमाणें करीत असावें. होणाऱ्या सर्व गोष्टी दैवाधीन आहेत असें समजूनही मोठमोठाले मुनि मुक्ति मिळण्याकरितां उद्योग करितात. याकरितां लोकव्यवहारास अनुसरून जो उद्योग करणें असेल तो अवश्य करावा. त्यापासून सुखप्राप्ति होवो किंवा दुःख होवो. दैवानें कांहीं झालें तरी त्याविषयीं शोक करणें नाहीं. उद्योगावांचून कदाचित् कार्यसिद्धि झाली तरी ती अंध, पंगु इत्यादिकांच्या कार्यसिद्धीप्रमाणेंच समजली

पाहिजे. तीपासून सुख नाहीं. उद्योग करूनही जर सिद्धि झाली नाहीं तर दैवाधीन पुरुषावर तें दूषण रहात नाहीं. दैवानें होणारी जी कार्यसिद्धि ती सैन्य, मंत्र, मसलत, रथ, आयुध इत्यादिकांनीं होत नाहीं. बलवान् दुःख भोगितो, बलहीनास सुखप्राप्ति होते. बुद्धिमान् भुकेनें व्याकूल होऊन भूमीवर स्वस्थ निजतो. बुद्धिहीन उत्कृष्ट विषयांचा उपभोग करितो. भित्र्यास जयप्राप्ति होते. शूराचा पराजय होतो. कारण जन्ममरणादि सर्व व्यवहार दैवाधीन आहेत. त्याविषयीं शोक किंवा आनंद मानणें हें योग्य नाहीं. आपण कोणत्याही कृत्याचा उद्योग करीत असावें, पुढें दैवाप्रमाणें जें होणें असेल तें होईल. ) असें गुरूनीं देवांस सांगून त्यांचें समाधान केलें.

पुढें सर्व देवांचा शुंभासुरानें पराभव केल्यानंतर देव राज्यभ्रष्ट होऊन अत्यंत चिंताक्रांत झाले. आणि बृहस्पति जवळ येऊन प्रार्थना केली कीं, आम्हीं या संकटापासून तरून आमचे सर्व मनोरथ पूर्ण होण्याजोगें कांहीं यज्ञादिक अनुष्ठान करावें अशी सर्व देवांची प्रार्थना ऐकून बृहस्पति म्हणतातः—

“ बृहस्पतिरुवाच—सर्वे मंत्राश्च वेदोक्ता दैवाधीनफलाश्च ते ।
न स्वतंत्राः सुराधीश तथैकांतफलप्रदाः ॥
मंत्राणां देवता यूयं ते तु दुःखैकभाजनम् ।
जाताः स्म कालयोगेन किं करोमि प्रसाधनम् ॥
इंद्राग्निवरुणादीनां यजनं यज्ञकर्मसु ।
ते यूयं विपदं प्राप्ताः करिष्यंति किमिष्टयः ॥
अवश्यंभाविभावानां प्रतीकारो न विद्यते ।

उपायस्त्वथ कर्तव्यः इति शिष्टानुशासनम् ॥
दैवं हि बलवत्केचित् प्रवदंति मनीषिणः ।
उपायवादिनो दैवं प्रवदंति निरर्थकम् ॥
दैवं चैवाप्युपायश्च द्वावेवाभिमतौ नृणाम् ।
केवलं दैवमाश्रित्य न स्थातव्यं कदाचन ॥
उपायः सर्वथा कार्यो विचार्य स्वधिया पुनः ।
तस्माद्ब्रवीमि वः सर्वान् संविचार्य पुनः पुनः ॥ "

( अर्थ–गुरूच्या भाषणाचें तात्पर्य–देवहो, वेदांतील सर्व मंत्र दैवाधीनफल आहेत. म्हणजे दैवाची अनुकूलता असल्याशिवाय मंत्रापासून कांहीं फल नाहीं. मंत्र स्वतंत्र नाहींत. व नियमानेंच त्यांपासून फलप्राप्ति होईल असेंही म्हणतां येत नाहीं. कारण मंत्रांच्या देवता जे देव ते तुम्हीं तर कालगतीनें दुःखांत निमग्न अहांत. यज्ञांत इंद्र, अग्नि, वरुण इत्यादि देवतेंचे आराधन असतें त्या देवता तुम्हीं विपत्तीनें व्याप्त आहां. अशा प्रसंगांत यज्ञादि कर्म करून उपयोग काय ? ज्या गोष्टी अवश्य होणाऱ्या आहेत त्या कधींही चुकत नाहींत. तथापि उपाय करीत असावें असें विद्वानांचें म्हणणे आहे. कोणी विद्वान् दैवच थोर आहे असें म्हणतात. उपायवादी दैव निरर्थक आहे असें मानितात. दैववादी आणि उद्योगवादी यांचा सिद्धांत सांगून आतां बृहस्पति आपला खरा सिद्धांत सांगतात. दैव आणि उद्योग या दोहींचाही मनुष्यानें स्वीकार केला पाहिजे. केवळ दैवाचा आश्रय करून बसणें बरोबर नाहीं. आपल्या बुद्धीनें विचार करून उद्योग करावा. ) असें बृहस्पतीनें सांगून देवांस उद्योगावि-

षयीं प्रवृत्त केलें. या ठिकाणीं बृहस्पतीच्या भाषणावरून उद्योगवाद्या-स असें वाटेल कीं, आमचा उद्योगच खरा आहे म्हणून बृहस्पतीनीं देवांस उद्योग करावा म्हणून सांगितलें. परंतु मागें सांगितलेंच आहे कीं, सुसंगती मिळणें व तीपासून चांगला लाभ होणें ह्या गोष्टी दैवाधीनच आहेत. याची आठवण पूर्ण ठेवावी. गुरुजीनीं उद्योग करा म्हणून सांगितलें तथापि तो उद्योग करण्याची वासना होणें व तो उद्योग करून त्यापासून फलप्राप्ति होणें हें दैवाधीन आहे. यांत कांहीं फेरफार होणें नाहीं. याच अभिप्रायानें व्यासानीं महाभारताच्या वनपर्वांत द्रौपदी आणि धर्मराज यांच्या भाषणद्वारा निश्चय केला आहे कीं,—

**" एवं हठाच्च दैवाच्च स्वभावात्कर्मणस्तथा ।**
**यानि प्राप्नोति पुरुषस्तत्फलं पूर्वकर्मणाम्॥"**(अ० ३२ श्लो० २०)

( अर्थ–हट म्हणजे कांहीं यत्न न करितां जो लाभ होतो तो. दैव म्हणजे देवतेचें आराधन करून होणारा लाभ. स्वभाव म्हणजे सहज कांहीं कार्यास प्रवृत्त झालें असतां होणारा लाभ. जसें नष्ट झालेली कपर्दिका ( कवडी ) शोधीत असतां रत्नाचा लाभ व्हावा तसें. *कर्म म्हणजे स्वतः कांहीं उद्योग करून म्हणजे दान वगैरे घेऊन

---

*या चारही शब्दांचें व्याख्यान ग्रंथकारानें ग्रथांतच स्वतः श्लोकरूपानें केलें आहे कीं,-
" अकस्मादिह यः कश्चिदर्थं प्राप्नोति पूरुषः । तं हठेनेति मन्यंते स हि यत्नो न कस्यचित् ॥ १ ॥ यच्चापि किंचित्पुरुषो दिष्टं नाम भजत्युत । दैवेन विधिना पार्थ तद्दैवमिति निश्चितम् ॥ २ ॥ यत्स्वयं कर्मणा किंचित्फलमाप्नोति पूरुषः । प्रत्यक्षमेतल्लोकेषु तत्पौरुषमिति श्रुतम् ॥ ३ ॥ स्वभावतः प्रवृत्तो यः प्राप्नोत्यर्थं न का-रणात् । तत्स्वभावात्मकं विद्धि फलं पुरुषसत्तम ॥ ४ ॥ एवं हठाच्च दैवाच्च स्व-भावात्कर्मणस्तथा । यानि प्राप्नोति पुरुषस्तत्फलं पूर्वकर्मणाम् ॥ ५ ॥ " इति.

जो लाभ होतो तो. ह्या चारही प्रकारांनीं सुख, दुःख, लाभ, अलाभ जें प्राप्त होतें तें सर्व पूर्वकर्माचें म्हणजे प्रारब्धाचेंच फल आहे. या चारही प्रकारांनीं जो लाभ होतो त्याविषयीं अनेक मतवाद्यांचीं अनेक मतें आहेत. परंतु व्यासांनीं सर्वमतांविषयीं उदासीन होऊन प्रारब्धच प्रधान आहे असा निश्चय केला.

आतां उद्योगच श्रेष्ठ, त्याशिवाय कांहीं नाहीं असा पक्ष घेऊन बसणारे लोक पुष्कळ आहेत. व त्यांच्या पक्षास अनुसरणारेही पुष्कळ आहेत. व त्यांस परिणामीं दैवाचेंच अवलंबन करावें लागतें. परंतु ते प्रत्यक्ष आपल्या तोंडानें ती गोष्ट कबूल करीत नाहींत. इतकाच फेर आहे, यापेक्षां दूसरें कांहीं नाहीं. उद्योग करावा तोच थोर आहे असा जरी पक्ष खरा ठरला तरी मनुष्याकडून उद्योग होणें व उद्योग होऊन योग्यफल मिळणें हें मनुष्याचा स्वाधीन नाहीं. जसें जन्म, मरण, सुख, दुःख यांत खटपट करून कांहीं कमी जास्ती करितां येत नाहीं. हा जसा पूर्ण अनुभव आहे, तसेंच सर्व कृत्यांविषयीं समजलें पाहिजे. एका कवीनें म्हटलें आहे कीं,–

“ कर्मणा बाध्यते बुद्धिर्न बुद्ध्या कर्म बाध्यते ।
सुबुद्धिरपि यद्रामो हैमं हरिणमन्वगात् ॥ ”

( अर्थ–नशीबानें बुद्धि बिघडते. बुद्धीनें नशीबांत फेर पडत नाहीं. याला दृष्टांत रामचंद्र परमबुद्धिमान् असून सोन्याचा मृग आहे असें मानून त्याच्या मागें गेले. ) हें केवळ नशीबानेंच झालें. कारण सोन्याचा हरिण नसतो हें रामचंद्रास बुद्धीनें समजत नव्हते काय? असो, नशीब आणि उद्योग हा विषय प्राचीनकालापासून वादग्रस्त आहे यांत संशय नाहीं. हा विषय कितीही विस्तृत लिहिला तरी

शंकानिवृत्ति होणार नाहीं. तुम्हीं सर्व उद्योग सोडून अगदीं स्वस्थ बसा. प्रारब्धानें जें होणें असेल तें होईल. असें व्यासासारखे थोर ज्ञातेही स्पष्ट सांगत नाहींत. उद्योग करीत असावें प्रारब्धानें जें कांहीं होणें असेल तें होईल. उद्योग होणें हेंही प्रारब्धाधीन आहे, असें मळमळीत भाषण ठिकठिकाणीं दृष्टीस पडतें. या मळमळीत भाषणावर उद्योगवादी असें सांगतो कीं, जो चोरी करितो त्याला वाईट म्हणूं नका. त्याची निंदा करूं नका. कारण तो दोष त्या मनुष्याकडे नाहीं. प्रारब्धाच्या प्रेरणेनें सर्व कृत्य होतें. त्याला वेळोवेळीं मूर्ख गाढव म्हणून त्रास देणें हें योग्य नाहीं. बाल्यावस्थेंत असणाऱ्या मुलांसही चांगल्या रीतीनें वागण्याविषयीं उपदेश करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण तीं मुलें त्यांस जसें प्रारब्ध वागवील तशीं वागतील. उपदेश करून त्याचा उपयोग काय ? इत्यादि पुष्कळ आक्षेप आहेत. ते किती लिहावे ? व सिद्धांत तरी काय करवा ? शंका घेणारा जवळच असला म्हणजे याविषयावर सिद्धांत लिहिणें फार कठीण आहे. ज्याचा तो एकटाच असल्यामुळें वाटेल तसें लिहून त्यालाच सिद्धांत म्हणतो. याचा वाद करून जर सिद्धांत करण्याचें मनांत आणिलें तर फार दिवस यांत घालविले पाहिजेत. ज्या गोष्टींचा साधारण विद्वानांनीं सिद्धांत केला, त्याजवर शंका घेऊन जर वादास आरंभ केला तर वाद करितां येणार नाहीं काय ? परंतु, " बाबावाक्यं प्रमाणं" असें मानून स्वस्थ बसलें पाहिजे. माझें मत असें कीं,–

**" सा सा संपद्यते बुद्धिः सा मतिः सा च भावना ।**
**सहायास्तादृशा एव यादृशी भवितव्यता ॥"**

(अर्थ–प्रारब्धानें जें अवश्य होणें आहे तशी तशी बुद्धि, म्हणजे बोध हो-

तो, तशी मनीषा होते, भावना तशीच होते, सहाय तसेंच मिळतें, यांत संशय नाहीं. ) कोणत्याही वादांत कांहीं एक प्रमाण मानून चाललें तर वादाची समाप्ति होते. प्रमाणास प्रमाण काय ? असें विचारणें योग्य नाहीं.

नशीब थोर किंवा उद्योग थोर असा प्रश्न केला तर कोणीं आपला अनुभव सांगणार, कोणीं अनुमान सांगणार, कोणी व्यासादिकांच्या वाक्यावर विश्वास ठेऊन स्वस्थ बसणार. कोणीं उद्योग करणार, असा प्रत्येकाचा अभिप्राय निरनिराळा असल्यामुळें सर्वांस एक सिद्धांत कसा मान्य होईल ? ही शंका आहेच. परंतु यथामति विचार करून प्रारब्ध प्रधान आहे असा झालेला माझा निश्चय लिहून विद्वानांपुढें ठेविला आहे. याचें अवलोकन करून गुणदोषांचा विचार करणारे ज्ञाते समर्थ आहेत. एका कवीनें देवाजवळ मागणें मागितलें आहे कीं,—

" इतरकर्मफलानि यदृच्छया लिखितानि सहे चतुरानन ।
अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ॥ "

( तात्पर्य—ब्रह्मदेवा, आपल्यास वाटेल तशी इतर कर्मफलें लिहा, परंतु अरसिकांस म्हणजे अज्ञान्यांस कवित्व ( पंडितपणा ) निवेदन करणें हें आमचे प्रारब्धीं लिहूं नका, असें त्रिवार मागितलें आहे. )

" एतस्मात्किमिवेंद्रजालमपरं यद्गर्भवासस्थितम् ।
रेतश्चेत्तति हस्तमस्तकपदप्रोद्भूतनानांकुरम् ॥
पर्यायेण शिशुत्वयौवनजरावेषैरनेकैर्धृतम् ।
पश्यत्यात्ति शृणोति जिघ्रति तथा गच्छत्यथागच्छति ॥ "

**विद्यारण्य.**

समाप्त.

# सूचना.

अपने यन्त्रालय में वैदिक, वेदान्त, पुराण, धर्मशास्त्र, न्याय, छन्द, ज्योतिष, काव्य, अलंकार, चम्पू, नाटक, कोश, वैद्यक, साम्प्रदायिक स्तोत्रादि संस्कृत ग्रन्थ और हिंदुस्थानी भाषा के अनेकानेक ग्रन्थ जो विक्रयार्थ प्रस्तुत हैं उन की कीमत और डाकमहसूल समझने के लिये आध आने का टिकट भेजने से विनादाम बडा सूचीपत्र भेजा जाता है.

---

पुस्तकें मिलने का ठिकाना–

गंगाविष्णु श्रीकृष्णदास,

"लक्ष्मीवेङ्कटेश्वर" छापाखाना,

कल्याण–मुंबई.